राष्ट्रीय चरित्रमाला

# विट्ठल रामजी शिंदे

गो.मा. पवार



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अणुक्रमणिका

# १. प्रास्ताविक

विठ्ठल रामजी ऊर्फ अण्णासाहेब शिंदे हे एक संपन्न, त्यागशील आणि ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वाचे पुरुष होते. विसाव्या शतकाच्या पहिल्या तीस पस्तीस वर्षात त्यांच्या कर्तृत्वाचा भरघोस आविष्कार झाला. आध्यात्मिक, सामाजिक, राजकीय व संशोधन विषयक क्षेत्रांत त्यांनी मौलिक स्वरूपाची कामगिरी केली. आध्यात्मिक-सामाजिक ध्येयसिध्दीसाठी आयुष्यभर फकिरी स्वीकारणारी त्यांच्यासारखी विद्याविभूषित व्यक्ती महाराष्ट्रात तरी विरळा. माणुसकीला कलंकभूत ठरणारी अस्पृश्यतेची म्हणून एक समस्या आहे, याची भारतात फारशी कोणाला जाणीव नव्हती, अशा काळात १९०६ मध्ये भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळी (डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया) ही संस्था स्थापन करून अखिल भारतीय पातळीवर अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याला त्यांनी हात घातला. स्वार्थत्यागपूर्वक आयुष्यभर त्यांनी केलेले हे कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे म्हणावे लागेल. त्यांची या कामाबद्दलची तळमळ, त्यासाठी त्यांनी केलेले अपार कष्ट व स्वार्थत्याग यांमुळे विठ्ठल रामजी शिंदे हे कर्मवीर, महर्षी या उपाधींनी ओळखले जाऊ लागले.

महर्षी शिंदे यांनी केलेले अस्पृश्यता निवारणाचे व अस्पृश्य वर्गाची सुधारणा करण्याचे कार्य ऐतिहासिकदृष्टया मूलभूत स्वरूपाचे आहे हे खरेच. परंतु त्यांनी आयुष्यभरात केलेल्या कामाचा हा एक भाग होता. महर्षी शिंदे हे मूलतः आध्यात्मिक वृत्तीचे पुरुष होते. आयुष्यभर त्यांनी उदारमतवादी ब्राह्मधर्माचा प्रसार करण्याचे कार्य केले. अस्पृश्योद्धाराचे कार्य त्यांच्या अंतःकरणातील धार्मिक वृत्तीतून निर्माण झाले होते. त्यांनी केलेल्या अन्य सामाजिक व राजकीय कार्याच्या मुळाशी धर्मभावनेचाच पाया होता. अस्पृश्यता निवारणाच्या कामाशिवाय इतर सामाजिक स्वरुपाचे कार्यही त्यांनी केलेले आहे. मुरळी सोडण्याची चाल बंद व्हावी यासाठी त्यांनी प्रयत्न केले. मुलांप्रमाणेच मुलींनाही सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा लाभ मिळावा असा त्यांचा प्रयत्न होता. शेतक-यांची सुधारणा हाही त्यांच्या आस्थेचा विषय होता. गोरगरीबांचा कैवार घेणारा बहुजन पक्ष स्थापन करून त्यांनी राजकारणात भाग घेतला. म.

गांधींचे अनुयायित्व पत्करून, शेतक-यांत जागृती करून, मिठाच्या सत्याग्रहात भाग घेऊन १९३० साली त्यांनी तुरुंगवासही भोगला. महर्षी शिंदे यांच्या सामाजिक कार्याप्रमाणेच त्यांचे संशोधनकार्यही मौलिक स्वरूपाचे आहे. भारतातील अस्पृश्यतेसंबंधी शास्त्रशुध्द संशोधन प्रथमत: महर्षी शिंदे यांनीच केलेले आहे. त्यांच्या समाजशास्त्रीय संशोधनाप्रमाणेच कानडी-मराठी, कोकणी-मराठी याबद्दलचे तौलनिक स्वरुपाचे भाषाविषयक संशोधनही महत्त्वाचे ठरले. महर्षी शिंदे यांनी केलेल्या विविध प्रकारच्या कार्यातून त्यांच्या प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार होतो.

महर्षी शिंदे यांच्या सा-या जीवनकार्यामध्ये एक अंत:सूत्र दिसते. त्यांचे समाजकारण असो की राजकारण असो, त्यांची सारी धडपड जुटीसाठी, एकात्मतेसाठी होती. फुटीचे, सोपे, तात्कालिक यश देणारे पण अंतिमत: हानिकारक असणारे समाजकारण, राजकारण त्यांनी केले नाही, की सहजी लोकप्रियता देणारा फुटीचा एकदेशी विचार कधी मांडला नाही. तथाकथित अस्पृश्य आणि स्पृश्य, असे दोन्ही वर्ग एकमेकांत अगदी मिसळून जावेत या प्रेरणेने त्यांनी आयुष्यभर कार्य केले. मराठा वर्गाने राष्ट्रीय प्रवाहापासून अलग राहू नये असा त्यांनी प्रयत्न केला. ब्राह्मणेतर पक्षाला जसा त्यांचा विरोध होता तसाच मराठा- मराठेतर असा नवा भेद करणा-यांनाही होता. स्त्रिया ह्या पुरुषांच्या जोडीने यायला पाहिजेत अशी त्यांची तळमळ होती. एकत्वाचे अंत: सूत्र त्यांच्या संशोधनपर लेखनातही दिसून येते. दोन संस्कृती असोत की जाती असोत, दोन प्रांत असोत की दोन पंथ असोत, अथवा दोन भाषा असोत, त्यांतील भेदापेक्षा त्यांच्यातील एकात्मता त्यांच्या दृष्टीला दिसते, व ती त्यांना महत्त्वाची वाटते.

आयुष्यभर सर्व प्रकारच्या एकात्मतेचा ध्यास घेणारे व त्याला अनुसरून मौलिक स्वरुपाचे काम करणारे अण्णासाहेब शिंदे यांचे व्यक्तिमत्त्व कसे घडले व समाजजीवनाशी निगडित अशा प्रकारचे कार्य त्यांनी कसे केले हे आपण पुढील प्रकरणांतून काहीशा विस्ताराने पाहू.

## २. बालपण, शिक्षण व व्यक्तिमत्त्वाची घडण

विठ्ठल रामजी ऊर्फ अण्णासाहेब शिंदे यांचा जन्म खानदानी मराठा कुटुंबात २३ एप्रिल १८७३ रोजी, हल्ली कर्नाटक राज्यात असलेल्या जमखंडी या संस्थानाच्या गावी झाला. कानडी आणि मराठी अशा दोन्ही संस्कृतींचा मेळ या गावी होता. विठ्ठल रामजींच्या आजोबांचे नाव बसवंतराव व आजीचे संताबाई असे होते. ह्या कानडी मुलखात त्यांच्या आजाआजीला लोक बसप्पा व सत्यव्वा म्हणत. त्यांचे आजोबा बसवंतराव हे मूळ लष्करी पेशातले होते, नंतर ते शेती करू लागले. घर एकंदरीत सुखवस्तू. त्यांच्या आजोबात मराठ्यांची, तर आजीत कर्नाटक्यांची लक्षणे उतरली होती. आजोबा नागरी, दरबारी व गुलहौशी, तर आजी संताबाई खेडवळ, राकट व कुणबाऊ. ती वृत्तीने धार्मिक असून यल्लमा या कानडी देवतेला भजणारी होती. त्यांच्या आईची आई गंगाबाई वडिलांच्या आईप्रमाणे धार्मिक नव्हती. मात्र ती स्वतःच धर्माची मूर्ती होती. ती एखाद्या वैष्णव ब्राह्मणीप्रमाणे दिसायची, तिच्यात रूढ धर्माचा वरपांगीपणा नव्हता, की धर्मभोळेपणा नव्हता. आपल्या आजीचेच गुण आईत उतरल्याचे अण्णासाहेब सांगतात.

अण्णासाहेबांच्या वडिलांचे नाव रामजी (जन्म अदमासे १८३५ मृत्यू १९१०) व आईचे नाव यमुनाबाई होते. या यमुनाबाई जमखंडीजवळील आलगूर गावचे श्री. कृष्णराव काळे यांच्या कन्या होत. रामजीबाबा कोणा शास्त्रीबोवाजवळ लिहायला व हिशेब ठेवायला शिकले. जमखंडी संस्थानात त्यांनी काही काळ शिक्षकाची तर काही काळ कारकुनी पेशातील वरच्या हुद्याची नोकरी केली.

विठ्ठल रामजींच्या बालपणी घरामध्ये त्यांची भावंडे म्हणजे त्यांचा मोठा भाऊ परशुराम, ते स्वतः आणि त्यांची धाकटी बहीण जनाक्का, ही होती. त्या काळानुसार हया सगळया भावंडांची लग्ने त्यांच्या लहानपणी म्हणजे इ. स. १८८२ मध्ये झाली. विठ्ठल रामजींची वधू त्यांच्या आत्येची मुलगी रुक्मिणी ही होती. त्यांच्या वडील भावाचा १८८५ मध्ये मृत्यू झाला. वडील भावाच्या मृत्यूनंतर घरात मुलांमध्ये तेच वडील झाले., व त्यांच्या स्वभावातील

बालपणीचा हूडपणा कमी होऊन स्वभावात गंभीरपणा आला. वडिलांनी संस्थानी नोकरीचा राजीनामा दिल्याने पूर्वीचा सुखवस्तूपणा जाऊन दारिद्य आले होते. सुखवस्तूपणाचा अनुभव घेतल्यानंतर दारिद्रयात हाल काय असतात याचा अनुभवही विठ्ठल रामजींनी लहानपणीच घेतला. मात्र घरातील शांत आणि आनंदी वातावरणामुळे त्यांना दुः ख असे जाणवले नाही. त्यांचा हायस्कूलमधील शिक्षणाचा काळ आनंदात गेला. श्री. त्र्यंबकराव खांडेकर, श्री. वासुदेवराव चिरमुले,श्री.गणेश शास्त्री जोशी व श्री.आप्पा काळे यांच्यासारखे चांगले शिक्षक त्यांना मिळाले. शास्त्राप्रमाणेच इंग्रजी,मराठी,संस्कृत या भाषांचा अभ्यास त्यांनी मोठ्या गोडीने केला. त्यांचे स्वभावतः च सौंदर्यग्राही मन साहित्यातील विविध सौंदर्याचा आस्वाद घ्यायला उत्सुक असे. आपल्या सौंदर्योन्मुख वृत्तीचे वर्णन करताना त्यांनी म्हटले आहे,"माझ्या घरी जातिभेद नव्हता तसा माझ्या हृदयात संस्कृतिभेदाचा किंवा पक्षपाताचा कृत्रिमपणाही नव्हता. सौंदर्य जेथे भेटेल तेथे ऊर्ध्वहस्ताने स्वीकारण्यास मी लहानपणापासून एका पायावर तयार आहे. मग ते इंग्लंडातले असो की स्वदेशातले असो,शहरातले असो की खेड्यातले असो,संस्कृत असो की प्राकृत असो,ते स्वाभाविक असले की पुरे., मी त्याला बिलगलोच असे समजावे."

त्यांचे वडील रामजीबाबा यांना धर्मशास्त्र, ज्योतिष इत्यादींची तांत्रिक माहिती होती. मराठी पोथ्यांचा त्यांचा चांगला व्यासंग होता. राहणीचे वळण ब्राह्मणी होते. व सर्व जातींतील संभावित माणसांशी त्यांचा स्नेह असे. वृत्तीने ते धार्मिक होते. पंढरपूरच्या वारकरी संप्रदायाकडे आकृष्ट होऊन ते वा-या करु लागले. जमखंडी येथील विठोबाच्या मठात तुकारामबीजेपासून चालणा-या सप्ताहात रामजीबाबांचा पुढाकार असे.

त्यांच्या घरातील वळण सात्त्विक व वातावरण शुध्द होते. पूर्वीच्या काळातील सुखवस्तूपणा जाऊन नंतर दारिद्रय आले तरी या शुध्द व सात्त्विक वातावरणात फरक पडला नाही. आपल्या वडिलांच्या भागवत धर्मातून व आईवडिलांच्या आचरणातून आपली भावी सामाजिक सुधारणा उदय पावली असे विश्लेषण अण्णासाहेब करतात.

"विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ

कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे"

या अभंगाचा ठसा त्यांच्या बाबांनी व आईने त्यांच्या ग्रहणशील मनावर आपल्या प्रेमळ आणि शुध्द आचरणांनी उठविला. या संस्कारात पुढे ब्राह्य समाजानेही काही भर घातली असे त्यांना वाटत नाही.

त्यांच्या घरी पडदा (गोषा) नव्हता, की जातिभेद नव्हता. ते नुसता पडदा पाळीत नसत,

एवढेच नव्हेतर त्यांच्या अंतः करणात पडद्याला स्थान नव्हते. घरोब्याच्या मंडळीत मोकळेपणाने,आपलेपणाने स्त्रीपुरुष,लहानथोर वावरत. त्यांच्या घरात जातिभेदाचा संस्कारच कुणाच्या मनावर झालेला नसल्याने आधुनिक सुधारकांप्रमाणे जातिभेद मोडण्याचा खटाटोप करण्याचा प्रश्नच उद्भवला नाही. सामान्यतः मराठयांच्या घरी न जेवणारी ब्राह्मण लिंगायत मंडळी त्यांच्या विश्वकुटुंबी घरी जेवत. न्हावी,धोबी,मुसलमान यांच्याशी कधी त्यांच्या घरात पंक्तिभेद केला जात नसे. प्रापंचिक विपत्ती, दारिद्रय, आजार, मरण, कर्ज अशा आपत्तीतही घरातील शांतीचे वातावरण कधी क्षुब्ध होत नसे. घरात साहजिकपणे सामाजिक सुधारणेची तत्त्वे पाळली जात, त्याचे रहस्य समता आणि स्वतंत्रता, उदारता आणि स्वाभिमान यांच्या समतोलात होते. पोकळ डौल सोडून ख-या खु-या समानतेने व अंतः करणापूर्वक प्रेमाने जे वागत त्यांच्याशीच हा समानतेच्या पातळीवरून प्रेमपूर्वक व्यवहार व्हायचा.

अण्णासाहेबांच्या मतानुसार सामाजिक अथवा धार्मिक सुधारणेला शुध्द बुध्दिवादापेक्षा सहृदयतेचेच अधिष्ठान असावे लागते. त्यांच्या घरातील वागण्याच्या मुळाशी हेच तत्त्व होते.

अण्णासाहेबांच्या मनाच्या विकासात त्यांच्या आईलाही महत्त्वाचे स्थान आहे. तिचा गळा गोड. गोपीकृष्णावरची सुदर कानडी गाणी ती म्हणायची. तिने सासूचा छळ व दारिद्रयाच्या वेदना सहन केल्या. मात्र मनाची शांती,रसिकता,आनंदी वृत्ती कमी झाली नाही. बाळंतपणे, आजार,मुलांचे मृत्यू यांत तिची शक्ती खचली. तरी तिने दुःखाचा,निराशेचा उद्गार काढला नाही,संसाराचा तिटकारा केला नाही. तिने माहेरच्या सुखदुःखाच्या गोष्टी रसिकतेने सांगून मुलांची करमणूक करावी. अण्णासाहेब लिहितात “खडतर दारिद्र्यात आईच्या गोष्टी व गाणी हाच आमचा मेवा. तिची आनंदी आणि विनोदी वृत्ती हीच आमची विश्रांती--आईच्या या आत्मसंतोषी वृत्तीचे बाळकडू जे आपल्याला मिळाले ते पुढील आयुष्याचे भांडवल म्हणून उपयोगी पडले.”

अण्णासाहेबांच्या आध्यात्मिक- सामाजिक विचारात आणि कार्यात स्त्रियांना महत्त्वाचे स्थान मिळालेले दिसते. स्त्रियांबद्दलच्या दाक्षिण्यभावाचा उगम त्यांच्या मातृप्रेमात आहे. निसर्गाच्याही आधी आपण पहिले हृदयदान दिले ते आईला असे ते म्हणतात.

जमखंडी गाव तीन डोंगरांच्या कुशीत वसलेला. अण्णासाहेबांचे वडील पावसाळ्याच्या अखेरच्या दिवसात घरातील सर्वांना घेऊन एखाद्या रम्य डोंगरावर वनभोजनाला जात. अण्णासाहेबांच्या ठिकाणी जे निसर्गप्रेम निर्माण झाले त्याचे मुळ त्यांच्या वडिलांच्या या आवडीत असावे. अण्णासाहेब आपल्या लहानपणी कधी कधी मित्रांसमवेत,तर कधी एकटेच निसर्गरम्य स्थळी जात. आपल्या हृदयाचा परिपोष या एकांत सहलीमुळे विशेष झाला असे

त्यांना वाटते.

अण्णासाहेबांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण जमखंडी येथेच झाले. इंग्रजी शाळेमध्ये हायस्कुलात गेल्यानंतर अण्णासाहेबांच्या बुध्दिमत्तेचा प्रभाव दिसू लागला. इंग्रजी, संस्कृत, मराठी या विषयांची त्यांना गोडी लागली.

त्यांच्या हायस्कूलच्या काळात इंग्रजी आणि संस्कृत साहित्याच्या सौंदर्याचा परिचय त्यांना झाला. मराठीवर अकृत्रिम प्रेम जडण्यास शाळेपेक्षा त्यांच्या घरीच साधने अधिक होती. श्रीधर, महिपती, तुकाराम, ज्ञानेश्वर यांच्या ग्रंथांची पारायणे वडील करीत असत. धाकटा विठूही इंग्रजी चौथीपाचवीत गेल्यावर रामविजय- हरिविजय इत्यादी ग्रंथ वाचून आपल्या मित्रांना अर्थ सांगत असे. सर्वच विषयात त्यांची गती चांगली होती. त्याचे श्रेय ते आपल्या बुध्दीपेक्षा रसिकतेला देतात. ही रसिकता त्यांना शाळेपेक्षा घरात, गुरूपेक्षा आईबापाकडूनच अधिक मिळाली. त्यांच्या हुशारीबद्दल श्री. खांडेकर, श्री. चिरमुले या त्यांच्या ब्राह्मण शिक्षकांना कौतुक वाटायचे. अण्णासाहेब १८९१ मध्ये मॅट्रिकची परीक्षा चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झाले.

अण्णासाहेबांच्या ज्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार त्यांच्या पुढील आयुष्यात त्यांच्या कार्यातून आणि विचारातून झाला त्याची घडण एकप्रकारे त्यांच्या बालपणीच झाली. कानडी आणि मराठी संस्कृतीचा मेळ असलेले जमखंडी गाव. तेथे कानडी आणि मराठी अशा दोन्ही भाषा बोलल्या जायच्या. दैवतेही द्राविड आणि मराठी. संस्थानचा अधिपती ब्राह्मण. घरात खानदानी मराठ्यांचे वळण. बाहेरील ब्राह्मणी रहाटीचा संपर्क. वडिलांची वारकरी संप्रदायाची उदार धर्मप्रवृत्ती. घरात सर्व जातींच्या व थरांच्या व्यक्तींना मुक्तद्वार. आईचा समंजस, प्रेमळ, भावनाप्रधान स्वभाव, आणि आजुबाजूचा रम्य निसर्ग. या सा-यांचे संस्कार विठ्ठल रामजींच्या ग्रहणशील बालमनावर झाले व त्यांचा त्यांच्या मनात एकमेळ होऊन गेला. त्यांच्या मनाची बैठक अध्यात्मप्रवण बनली, मनाला उदार व्यापकपणा आला, संमिश्र संस्कृतीत वाढल्यामुळे भेद जाणवण्याऐवजी ऐक्याची भावनाच जोपासली गेली, मन भावनाप्रवण बनले आणि वृत्ती सौदर्योन्मुख झाल्या.

विठ्ठल रामजींनी जमखंडी येथे काही काळ शिक्षकाची नोकरी केल्यानंतर, त्यांचे शिक्षक श्री. वासुदेवराव चिरमुले यांच्या प्रोत्साहनाने व मार्गदर्शनाने कॉलेजचे शिक्षण घेण्यासाठी १८९३ मध्ये ते पुण्यास गेले. त्यांच्या लहानपणीच पूर्वीची सुस्थिती जाऊन दारिद्य आले होते. पुण्यात शिक्षण घेण्यासाठी आरंभी डेक्कन मराठी एज्युकेशन असोसिएशनच्या शिष्यवृत्तीचा व इंटरमीजिएटनंतर श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या शिष्यवृत्तीचा आधार त्यांना मिळाला. १८९३ ते १८९८ अशी सहा वर्षे त्यांनी पुण्यात फर्ग्युसन कॉलेजमध्ये बी.

ए.व प्रथम वर्ष एल.एल.बी.चे शिक्षण घेण्यासाठी काढली. या काळात तेरदाळचे श्री.विष्णुपंत देशपांडे,कोल्हापूरचे श्री. गोविंदराव सासने व वाईचे श्री.ज.स.करंदीकर हे त्यांचे मित्र होते. पुढच्या आयुष्यभरातही त्यांच्याशी त्यांची जिव्हाळ्याची मैत्री राहिली.

विठ्ठल रामजी शिंदे यांची पुण्यातील सहा वर्षे काही प्रमाणात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची घडण करणारी तसेच आविष्कार करणारी, त्यांचा भावी जीवितक्रम निश्चित करणारी, या दृष्टीने महत्त्वाची असली तरी एकंदरीत त्यांच्या कौटुंबिक,मानसिक व आध्यात्मिक अस्वस्थतेची होती असे म्हणावे लागेल.

जमखंडीच्या त्यांच्या घरात आधीही दारिद्र होते परंतु घरच्या प्रेमळ वातावरणामुळे त्यांना ते दुः सह वाटले नाही. दारिद्र्यामुळे पुण्याच्या वातावरणात त्यांना एकाकी वाटत होते. कॉजेजमधील शिक्षणपध्दती आणि वातावरण त्यांना चैतन्यशून्य वाटत होते. नेमलेल्या अभ्यासक्रमात त्यांचे लक्ष लागत नसे. गावाकडील दारिद्याची चिंता होतीच. भगिनी जनाबाईला सासरच्या कलहामुळे माहेरी आणावे लागले. त्यांनी १८९५ मध्ये तिला पुण्यास शिक्षणासाठी आणून हुजुरपागेच्या शाळेत घातले. दोघांचा निर्वाह स्कॉलरशिपवर करावा लागे. पत्नीला शिक्षणासाठी पुण्यास ठेवण्याच्या इराद्याने तेथे आपल्या आईसह १८९६ काही काळ घर केले. खर्चाची मिळवणी करण्यासाठी शिकवण्याही त्यांना कराव्या लागत. ते १८९४ साली इंटरमीजिएट परीक्षेला व १८९७ साली बी.ए.ला नापासही झाले. मात्र त्यामुळे ते खचले नाहीत. आपली परीक्षापध्दती विद्यार्थ्यांना पिळून काढणारी आहे, घोडयांना पळविण्याच्या शर्यतीसारखी आहे असेच त्यांना वाटत होते. लौकिक अपयशाला दाद न देणारा स्वतःबद्दलचा खोलवरचा आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणी होता.

पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकत असताना १८९७ साली त्यांनी रोजनिशी लिहिली. हया रोजनिशीवरुन हया काळात त्यांच्या मनाची काही एक घडण होताना दिसत असली तरी, त्यांचे मन जे आधीच घडले होते त्याचाच मुख्यत्वे आविष्कार होतो. ते अभ्यासक्रमा बाहेरचे अवांतर वाचन पुष्कळ करीत होते. कॉलेजातील प्रासंगिक व वसंत व्याख्यान मालेतील वगैरे व्याख्याने ऐकत होते. काळ,केसरी यांसारखी वृत्तपत्रे वाचीत होते. या सर्वांवरील त्यांचे अभिप्राय त्यांच्या दृष्टिकोनाचा वेगळेपणा,बुध्दीची मार्मिकता व मनाची प्रगल्भता प्रकट करणारे आहेत.

या काळात त्यांचे मन धर्माकडे प्रबळ ओढ घेत होते,तसेच सामाजिक प्रश्नांबाबतही ते अत्यंत जागरूक होते. समाजातील काही घटना अथवा व्याख्याने असोत,वर्तमानपत्रे असोत त्यांत बहुजन समाजाचा विचार होत नाही याची त्यांना सखेद जाणीव होती. त्यांना वाटायचे

की व्याख्यात्यांनी माहीत असलेल्या गोष्टींचे चर्वितचर्वण करण्याऐवजी नवीन शास्त्रीय शोधाचे ज्ञान बहुजन समाजास द्यावे. धर्माला वाहिलेले एकही वर्तमानपत्र असू नये याबद्दलचा विषाद ते “हल्ली वर्तमानपत्राचा दररोज इतका केर पडतो पण त्यात धर्माच्या नावाने एक निर्माल्यही आढळत नाही” या शब्दांत प्रकट करतात. प्रो. जिनसीवाले यांचे स्त्रियांसंबंधी प्रतिगामी शेरे ऐकून त्यांना सात्त्विक संताप येत असे. प्रार्थना समाजाच्या उच्च धर्ममताचा प्रसार गांवढळात म्हणजे बहुजनसमाजातच होणे आवश्यक आहे हे त्यांना जाणवायचे. बारामतीचे श्री. कळसकर महार मांग लोकांसाठी काम करतात हे समजून त्यांच्याबद्दल त्यांना आदर वाटायचा व आपण यासारख्या कामाला हात घातला नाही याची खंत वाटायची. भावी आयुष्यात आपणही अशा प्रकारचे काम करण्यासाठी मंडळी स्थापन करावी यासंबंधी ते आपले मित्र गोविंदराव सासने, माधवराव हुल्याळ, केशवराव कानेटकर यांच्याशी चर्चा करीत होते. तात्पर्य, या काळात धार्मिक आणि सामाजिक असे विषय सारख्याच तीव्रतेने त्यांच्या मनाला भिडत होते.

शिक्षणासाठी फर्ग्युसन कॉलेजमध्ये व पुण्यात विठ्ठल रामजींनी काढलेली सहा वर्षे त्यांच्या भावी जीवितकार्याची दिशा ठरविण्याच्या दृष्टीने महत्त्वाची ठरली. ते जमखंडीला मॅट्रिकच्या वर्गात असतानाच आगरकरांच्या ‘सुधारक’ पत्रातील सुधारकी व अज्ञेयवादी मतांचा त्यांना परिचय व्हायला प्रारंभ झाला होता. त्यांचे लेख वाचून विचारस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, स्त्रीदाक्षिण्य यांसारख्या विषयावर तेथील वसंत व्याख्यानमालेत ते उत्साहाने बोलत होते. फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्रीव्हियसच्या वर्गात असताना त्यांनी जॉन स्टुअर्ट मिलचे लिबर्टी (स्वातंत्र्य), युटिलिटेरिॲनिझम् (उपयुक्ततावाद, बहुजनहितवाद), सब्जेक्शन ऑफ वुइमेन (स्त्रियांची गुलामगिरी) हे मूळ इंग्रजीतील ग्रंथ वाचले व त्यामुळे ते प्रभावित झाले. हर्बर्ट स्पेन्सरचे एज्युकेशन (शिक्षण), इंट्रॉडक्शन ऑफ दि स्टडी ऑफ सोशॉलॉजी या ग्रंथांचेही त्यांनी वाचन केले. स्पेन्सरच्या अज्ञेयवादी विचारांचा प्रभाव त्याकाळी केवळ युरोपातील देशातच नव्हे तर हिंदुस्थान- जपान या पौर्वात्य देशांतही झालेला होता. त्या काळातील सुशिक्षित मंडळी स्पेन्सरच्या अज्ञेयवादी विचारांनी झपाटल्यासारखी झाली होती. अण्णासाहेबांच्या मनावरही प्रारंभी मिल्- स्पेन्सरच्या इहवादी व अज्ञेयवादी विचारांचा दांडगा प्रभाव पडला. केळकरांच्या वाडयात राहात असताना त्यांनी पुढाकार घेऊन मित्रांचे एक छोटेसे चर्चामंडळही स्थापन केले. हया मंडळात ते मिल्- स्पेन्सरचे विचार अभिनिवेशाने मांडीत असत. या काळात त्यांच्या मनावर नास्तिक्याचे सावट आले होते. परंतु त्यांचा मनः पिंड त्यांच्या घरातील वारकरी संप्रदायाच्या शुध्द आध्यात्मिक वातावरणात तयार झाला होता. मिल्- स्पेन्सरच्या विचारात त्यांच्या आत्म्याची भूक शमविण्याची क्षमता नव्हती.

अमेरिकन युनिटेरिअन असोसिएशनचे प्रतिनिधी रेव्हरंड डॉ.जे.टी.संडरलंड यांच्यामुळे १८९५ मध्ये युनिटेरिअन धर्ममताची त्यांना पहिल्यांदा कल्पना आली. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या वेळी त्यांचे खणखणीत भाषण त्यांनी प्रथमतः ऐकले. नंतर त्यांनी डॉ. संडरलंड यांची समक्ष भेट घेऊन विचारविनिमय केला. युनिटेरिअन पंथाच्या ब-याच चोपड्या त्यांनी वाचल्या. याच सुमारास प्रो. मॅक्समुल्लर यांची धर्मावरील विस्तृत व्याख्याने त्यांनी वाचली. त्यांतील विचारांमुळे ते त्यांना जवळचे आप्तपुरुष वाटू लागले. या सा-याचा परिणाम होऊन ते प्रार्थना समाजाकडे आकृष्ट झाले.

ते १८९८ मध्ये पुण्याच्या प्रार्थना समाजात जाऊ लागले. रा. ब. का. ब. मराठे यांच्या प्रार्थना व व्याख्याने यांनी त्यांचे मन वेधले. श्री. गणपत भास्कर कोटकर, समाजाचे प्रचारक श्री.शिवरामपंत गोखले या वृध्द मंडळींचा त्यांचा स्नेह जमला. न्या.मू.रानडे व डॉ.भांडारकर यांचाही सहवास घडू लागला. ते म्हणतात, "या सा-या वृध्द मंडळींनी मला भारुन टाकून माझ्या तारुण्याचा आडमूठपणा, विचारांचा उच्छंखलपणा व अनुभवांचा हिरवटपणा या भोव-यातून माझी सुटका करुन शुध्द, उदार धर्माच्या शांत प्रवाहात मला आणून सोडले."

ते २९ मे १८९८ रोजी पुण्याच्या प्रार्थना समाजात उपासना पाहावयास गेले. त्यांच्या भगिनी जनाबाई ह्याही मैत्रिणीसमवेत उपासनेस आल्या होत्या. त्याही समाजाकडे आकृष्ट झाल्या. श्री. कोटकरांच्या कुटिरात पुणे प्रार्थना समाजातील वृध्द तरुण मंडळीसमवेत प्रीति-भोजनानिमित्त एक दिवस घालविला. दिवसभरातील सर्व उपक्रमांचा त्यांच्या मनावर अत्यंत अनुकूल परिणाम झाला. प्रार्थना समाज म्हणजे नुसती रविवारची सभा नसून देवाच्या कन्या पुत्रांचे एक शुध्द कुटुंब आहे अशी प्रतीती त्यांना आली. समाजात आणि समाजियांकडे त्यांचे जाणेयेणे सुरू झाले. प्रतापचंद्र मुझुमदार यांनी लिहिलेले केशवचंद्र सेन यांचे चरित्र वाचून प्रार्थना समाजाचे नुसते सभासद न होता या कामाला आजन्म वाहून घ्यावे अशी ओढ त्यांना लागली. याचा परिणाम म्हणून १८९८ मध्ये अण्णासाहेबांनी प्रार्थना समाजाची रीतसर दीक्षा घेतली. श्री. मोतीबुलासा, डॉ. भांडारकरांचे कनिष्ठ चिरंजीव देवदत्त, डॉ. वासुदेव अनंत सुखटणकर ही तरुण मंडळीही दीक्षा घेण्या-यांत त्यांच्याबरोबर होती.

अण्णासाहेब १८९८ मध्ये बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. १८९९ व १९०० ही दोन वर्षे सेकंड एल् एल्. बी. च्या टर्म्स भरण्यासाठी ते मुंबईला राहिले. मुंबईस त्यांचा श्री. बा. बा. कोरगावकर, श्री.द्वा.गो.वैद्य, श्री.वामन सदाशिव सोहोनी या प्रार्थना समाजी मंडळींशी परिचय झाला. याच काळात ते पुणे- मुंबई येथील समाजात उपासनाही चालवू लागले.

सुटीमध्ये जमखंडीला गेल्यावर रविवारी ते आपल्या घरी उपासना चालवू लागले.

बाहेरची मंडळीही येऊ लागली. प्रार्थना समाज म्हणजे आपल्या भागवत धर्माची सुधारून वाढविलेली आवृत्ती असे त्यांच्या बाबांना वाटू लागले.

विठ्ठल रामजींचा भावी जीवनक्रम निश्चित करणारी घटना १८९९ मध्ये घडली. रा. मोतीबुलासा हे इंग्लंडमध्ये तौलनिक धर्माच्या अध्ययनासाठी विलायतेतील ब्रिटिश ॲण्ड फॉरेन असोसिएशनची स्कॉलरशिप मिळवून विलायतेच्या प्रवासाला निघाले असता वाटेत पोर्ट सय्यद येथे वातज्वराचा विकार होऊन त्यांचे आकस्मिक निधन झाले. या घटनेने सर्व प्रार्थना समाजीयांना दुः ख झाले. पुणे प्रार्थना समाजात डॉ. भांडारकरांनी मोतीबुलासांच्या निधनानिमित्त एक विशेष प्रार्थना चालविली. त्यांना शोकावेग अनावर झाला होता. प्रार्थना संपल्यावर विठ्ठल रामजी डॉ. भांडारकरांजवळ गेले व त्यांना म्हणाले, "मोतीबुलासांच्या निधनाने रिकाम्या पडलेल्या जागेसाठी मला जर गुरुवर्यांनी पात्र ठरविले तर मी विलायतेस जाण्यास तयार आहे." ते ऐकून डॉ. भांडारकरांना आनंद झाला.

अण्णासाहेबांचा हा निश्चय साधासुधा नव्हता. ही काही मौजेखातर करावयाची विलायतेची सफर नव्हती. अटी कठिण होत्या. पसंत केलेल्या विद्यार्थ्याला जेमतेम निर्वाहाला पुरेल एवढीच सालिना १०० पौंडाची स्कॉलर्शिप दोन वर्षे मिळणार. प्रवासाचा खर्च त्यानेच करावयाचा. धर्मशिक्षण घेऊन आल्यावर आजन्म त्याने ब्राहम धर्मप्रचाराचे काम करावयाचे. निदान त्याशी विसंगत असे उदरभरणाचे दुसरे कार्य करावयाचे नाही.

आयुष्य खडतर दारिद्र्यात काढलेल्या वडिलांच्या मनात आशा होती की बी.ए.,एलएल्. बी.झालेल्या आपल्या मुलाची बडोद्यासारख्या संस्थानात चांगली वर्णी लागेल,दारिद्य फिटेल. घरच्या मंडळीचा आशाभंग करावयाचा, परदेशगमन करावयाचे व आल्यावर आयुष्यभर फकिरी पत्करावयाची. परंतु अण्णासाहेबांची धर्मभावना प्रबळ होती. त्यांनी निश्चय केला. आतापर्यंत बडोदे सरकारची कर्जरूप शिष्यवृत्ती घेतली होती. पुन्हा श्रीमंत सयाजीरावांच्याकडे जाऊन प्रवासासाठी त्यांनी दीड हजार रुपये मागितले. सयाजीरावांनी ते मान्य केले. अण्णासाहेबांनी प्रवासाची सर्व तयारी केली आणि २१ सप्टेंबर १९०१ रोजी गुरुजनांचा, कुटुंबियांचा व प्रियजनांचा निरोप घेऊन ऑक्सफर्ड येथील मँचेस्टर कॉलेजात दोन वर्षे धर्मशिक्षण घेण्यासाठी पर्शिया बोटीने प्रवासाला आरंभ केला.

# ३. धर्मशिक्षण आणि धर्मकार्य

विठ्ठल रामजी शिंदे हे ऑक्सफर्ड येथील मँचेस्टर कॉलेज या युनिटेरिअन धर्ममताच्या कॉलेजमध्ये धर्मशिक्षण घेण्यासाठी ११ ऑक्टोबर १९०१ रोजी दाखल झाले. भारतामध्ये ज्याप्रमाणे ब्राह्य अथवा प्रार्थना समाज या उदार धर्मसंस्था हिंदू धर्मातून विकास पावून एकेश्वरी उदारमतवादी सार्वत्रिक धर्माचे कार्य करू लागल्या त्याचप्रमाणे युनिटेरिअन धर्ममताचे थोडक्यात वैशिष्ट्य सांगायचे झाले तर असे म्हणता येईल,की सनातन ख्रिस्ती धर्म पितादेव, पुत्रदेव (येशू ख्रिस्त) व पवित्र आत्मा ही त्रयी मानतात,तर परमेश्वर हा सर्वतोपरी एकच असून ख्रिस्त हा केवळ अतिपवित्र साधुपुरुष,पण इतरासारखा मनुष्य होता असे या धर्ममताचे लोक मानतात. भारतीय अथवा पाश्चात्य एकेश्वरी सार्वत्रिक धर्म आधुनिक शास्त्र, तत्त्वज्ञान व विचारपद्धती यांच्याशी सुसंगत राहून धर्मकार्य करणारे पंथ आहेत.

धर्मप्रचारक पध्दतशीरपणे तयार करण्यासाठी स्थापन केलेले मँचेस्टर कॉलेज हे एक नमुनेदार कॉलेज आहे. एकेश्वरी उदारमतवादी धुरीणांनी हे कॉलेज काढले असले तरी त्यामध्ये एका विशिष्ट धर्ममताचा आग्रह नाही. "सत्य, स्वातंत्र्य व धर्म यांना वाहिलेले" असे या कॉलेजचे ब्रीद आहे. शिकणा-यांच्या विचारांना चालना देणे,धर्मविचाराच्या बाबतीत त्यांची मते मुक्त होतील असा प्रयत्न करणे हे या कॉलेजचे धोरण आहे. तेथील अध्यापकवर्गही सामान्यतः आधुनिक मताचाच असला,तरी एखादा प्राध्यापक जुन्या मताची कदर करणाराही असे. विठ्ठल रामजी ज्या वेळी या महाविद्यालयात गेले त्यावेळी त्यांना प्रो.अॅप्टन हे तत्त्वज्ञान, प्रो.कार्पेंटर हे तुलनात्मक धर्म व पाली भाषा, प्रो.ऑजर्स हे खिस्ती संघाचा इतिहास,प्रो.जॅक्स हे समाजशास्त्र,हे विषय शिकविणारे व्यासंगी प्राध्यापक होते. प्रिन्सिपॉल ड्रमंड हे बायबल आणि धर्मशास्त्र शिकवीत. प्रो.कार्पेंटर हे विठ्ठल रामजींचे विशेष गुरू होते. त्यांच्याजवळ त्यांनी तुलनात्मक धर्मशास्त्र या ऐच्छिक विषयाचा व पाली भाषा आणि बौध्द धर्म यांचा विशेष अभ्यास केला. हे सगळेच प्राध्यापक त्यांच्या त्यांच्या विषयाचे व्यासंगी अभ्यासक होते,तसेच वृत्तीने धर्मशील व स्वभावाने प्रेमळ होते. हे प्राध्यापक विद्यार्थ्यांना आळीपाळीने आपल्या

घरी चहापानास बोलवीत असत. सुट्टीच्या काळात आपल्याकडे राहण्यासाठी निमंत्रित करीत असत. मँचेस्टर कॉलेजमधील प्राध्यापक व विद्यार्थी मिळून त्यांचे एक मोठे कुटुंबच बनलेले होते. प्रो. कार्पेंटर यांच्या समवेत सरोवर प्रांती 'लीथ्स कॉटेज' या त्यांच्या घरी केलेल्या वास्तव्यकाळाचे हृदयंगम वर्णन विठ्ठल रामजी शिंदे यांनी त्या काळात लिहिलेल्या आपल्या रोजनिशीत केले आहे.

या दोन वर्षाच्या काळात अण्णासाहेब शिंदे यांनी धर्मविषयक अध्ययन तर सखोलपणे केलेच., त्याशिवाय महत्त्वाचे असे इंग्रजी साहित्य वाचले. मँचेस्टर कॉलेजमध्ये चर्चा करण्यासाठी तीन चर्चामंडळे अस्तित्वात होती- मार्टिनो क्लब,डिस्कशन क्लब व पॉझ् क्लब. या तिन्ही चर्चामंडळाचे विठ्ठल रामजी सदस्य होते. त्यांच्या सभांना ते नियमितपणे उपस्थित राहून भाग घेत असत. या चर्चामंडळाच्या वृत्तांत पुस्तकामध्ये त्याबद्दलच्या नोंदी आजही पहावयास मिळतात. पॉझ् क्लबच्या बैठकीमध्ये शिंदे यांनी ६ फेब्रुवारी १९०३ रोजी चर्चेसाठी ठराव मांडला तो असाः "धर्मकार्यात स्त्रिया अधिक प्रमाणात क्रियाशील झाल्या तर धर्मकार्य अधिक परिणामकारक रीतीने घडेल असे या सभेचे मत आहे". या चर्चेमध्ये शिंदे यांचे सहाध्यायी इवर्ट,राइट,बारनेस,फार्ले इत्यादींनी भाग घेतला. ठराव मताला टाकला तेव्हा तो अकरा विरुध्द सात मतांनी संमत झाला. सर्व कार्यक्षेत्रात स्त्रियांनी सहभागी असावे हा महर्षी शिंदे यांचा दृष्टिकोण त्याच काळात तयार झाला होता हे यावरुनही दिसून येते.

विठ्ठल रामजी शिंदे हे केवळ धर्माचे पुस्तकी शिक्षण घेण्यासाठी इंग्लंडमध्ये गेले नव्हते. स्वतःची धर्मबुध्दी विकसित करून धर्मप्रसाराची तयारी करणे हा त्यांचा मुख्य परंतु एक उद्देश होता. त्याशिवाय पुढे आयुष्यभर आपण गोरगरिबांसाठी कार्य करणार आहोत ही जाणीव मनात वागवून ते स्वतःची तयारी करीत होते असे दिसते. त्यांच्या महाविद्यालयात धर्मप्रसाराचे कार्य कसे करावे व त्या दृष्टीने उपासना कशा चालवाव्यात याचे शिक्षण दिले जात होतेच. ते स्वतः युनिटेरिअन, कॅथॉलिक, प्रोटेस्टंट, इपिस्कोपल इत्यादी विविध मतांच्या चर्चमधील उपासनांना हजर राहात होते. सुटीच्या काळात निमंत्रणावरुन ते स्वतःही उपासना चालवीत होते. ब्रिडपोर्ट येथे त्यांनी उपासना किती प्रभावीपणे चालवली व आपली धर्मविषयक मते कशी सडेतोडपणाने प्रतिपादली हे "दि ब्रिडपोर्ट न्यूज" या वृत्तपत्रात त्यावेळी आलेल्या वृत्तांतावरुन ध्यानात येते.

बहुजनसमाजात धार्मिकता वाढीस लागावी या हेतूने सुरू झालेल्या केसिक कनव्हेनशनला अथवा धर्ममेळ्याला ते उपस्थित राहिले होते.

टपालाच्या द्वारे धर्मप्रसाराचे कार्य करणा-या पोस्टल मिशनच्या अध्यक्ष मिस् टॅगर्ट व

चिटणीस मिस् हिल् यांची भेट घेऊन त्यांनी या कार्याची माहिती करुन घेतली. इन्क्वायरर् पत्राचे संपादक डेव्हिस, युनिटेरिअन सेक्रेटरी रेव्हरंड बोवी, संडेस्कूल असोशिएशनचे चेअरमन प्रिचर्ड या मंडळींना भेटून त्यांनी त्यांच्या त्यांच्या कामाची माहिती करून घेतली.

गोरगरिबांच्यासाठी कार्य करणा-या वेगवेगळया मिशनच्या कार्यपध्दती त्यांनी आस्थेने समजून घेतल्या. डोमेस्टिक मिशन चालवणारे रेव्हरंड समर्स यांच्या बरोबर ते गरीब वस्तीत गेले. तेथील आजारी बायांच्यासाठी त्यांनी प्रार्थनाही केली. मँचेस्टर येथील डोमेस्टिक मिशनचे मिशनरी रेव्हरंड बिशप यांच्याबरोबर गरीब वस्तीतील घरी जाऊन मिशनची कार्यपध्दती त्यांनी प्रत्यक्ष अनुभवली. ही सगळी निरीक्षणे करीत असताना भारतामध्ये आपल्याला अशा प्रकारचे कार्य करावयाचे आहे अशी खूणगाठ त्यांनी आपल्या मनाशी बांधली असावी.

अण्णासाहेब शिंदे हे केवळ करारी वृत्तीचे कर्तव्यतत्पर गृहस्थ होते असे नव्हे. ते जिज्ञासू रसिक होते, विविध प्रकारच्या सौंदर्याचे ते भोक्ते होते. म्हणून आपल्या इंग्लंडमधील दोन वर्षाच्या वास्तव्यकाळात काव्यनाटकादी साहित्याचेही त्यांनी वाचन केले आहे. सरोवर प्रांतातील व स्कॉटलंडमधील निसर्गसौंदर्याचा समरसून त्यांनी आस्वाद घेतला. वेगवेगळया कुटुंबातील लोकांची वर्तनाच्या बाबतीत नीतिमत्ता घसरलेली पाहून सचिंत,विचारमग्न झालेले दिसतात.

ह्या दोन वर्षाच्या वास्तव्यातील सुटीच्या काळात इंग्लंड, स्कॉटलंड, फ्रान्स, जर्मनी, स्वित्झर्लंड व इटली हे देश त्यांनी थोड्याफार प्रमाणात पाहिले. युरोपमधील सांस्कृतिक वातावरण, तेथील धर्मसंस्था, शिक्षणपध्दती, सार्वजनिक व कौटुंबिक जीवन व लोक-कल्याणकारी संस्था यांचे त्यांनी आस्थेवाईकपणे निरीक्षण केले, अनेक विद्वानांच्या व कार्यकर्त्यांच्या भेटी घेतल्या, कितीतरी प्रेक्षणीय इमारती व स्थळे पाहिली, धर्मविषयक अध्ययन-अवलोकन केले., अशा प्रकारे स्वतः ची धर्मबुध्दी विकसित करून धर्मप्रचारक या नात्याने स्वतः ची उत्तम प्रकारे तयारी केली आणि ऑक्टोबर १९०३ मध्ये ते हिंदुस्थानास परतले.

मुंबई प्रार्थना समाजाने १९०३ च्या नोव्हेंबर मध्ये एकमताने ठराव करून विठ्ठल रामजी शिंदे यांना प्रार्थना समाजाचे धर्मप्रचारक नेमले. धर्मप्रचारक या नात्याने त्यांनी केलेली कामगिरी पाहण्यापूर्वी आपण मुंबई प्रार्थना समाजाचे स्वरूप पाहू.

एकेश्वरी धर्ममताचा पुरस्कार करणारा ब्राह्म समाज प्रथम बंगालमध्ये राजा राममोहन रॉय यांच्या प्रेरणेने १८२८ मध्ये स्थापन झाला. ब्राह्म समाजाला बाबू केशवचंद्र सेन यांच्यासारखे

चिंतक व श्री. प्रतापचंद्र मुझुमदार यांच्यासारखे प्रभावी प्रचारक लाभले. महाराष्ट्रात एकेश्वरी धर्ममताचा पुरस्कार करणारी, मूर्तिपूजेचा निषेध करणारी व जातिभेद निर्मूलन करण्यास प्रवृत्त झालेली परमहंस सभा मुंबईत १८४० च्या सुमारास स्थापन झाली. या मंडळीची स्थापना करण्यात श्री. राम बाळकृष्ण (जयकर) व डॉ. आत्माराम पांडुरंग (तर्खडकर) यांचा पुढाकार होता. या विचारांना समाज प्रतिकूल आहे हे पाहून मंडळाचे काम गुप्तपणे चालत असे. परमहंस मंडळींच्या सभासदांची गुप्त यादी १८६० च्या सुमारास बाहेर फोडली गेल्यामुळे ही मंडळी बरखास्त झाली.

बाबू केशवचंद्र सेन हे १८६४ मध्ये मुंबईस येऊन ब्राहममताची माहिती देणारी भाषणे देऊन गेले होते. धर्मविषयक विचार करणारी आस्थेवाईक मंडळी १८६६ मध्ये डॉ. आत्माराम पांडुरंग यांच्या घरी जमली. त्यामध्ये बाळ मंगेश वागळे, भास्कर हरी भागवत, मामा परमानंद, सर्वोत्तम सखाराम मानकर, तुकाराम तात्या पडवळ, वासुदेव बाबाजी नवरंगे, अशी प्रमुख मंडळी होती. या मंडळीच्या अनेक बैठकी होऊन ऐहिक कल्याणावर विशेष दृष्टी ठेवून ही कार्ये हाती घेण्याऐवजी मनुष्याचे मुख्य कर्तव्य जे परमार्थसाधन त्याकडे विशेष दृष्टी ठेवून प्रार्थना समाजाची स्थापना करण्याचा विचार ठरला. व ३१ मार्च १८६७ रोजी ईश्वरोपासनेस प्रारंभ झाला. प्रारंभी या मंडळाचा निर्देश 'एकेश्वरी मंडळी' असा होत असे नंतर 'प्रार्थना समाज' हे नाव पत्करण्यात आले. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे व डॉ. रा. गो. भांडारकर हे वर्षदीडवर्षानंतर प्रार्थना समाजास मिळाले. श्री. भिकोबा दादा चव्हाण हे भंडारी जातीतील गृहस्थ प्रारंभी उपासना चालवीत. 'सुबोधपत्रिके' त त्यांचा उल्लेख प्रथम आचार्य असा होत असे.

न्यायमूर्ती रानडे यांनी 'साधकाचा विश्वास' या निबंधात प्रार्थना समाजाच्या तत्त्वांचे ३९ कलमात विवरण केले. त्यानंतर १८७३ साली प्रार्थना समाजास मान्य असलेल्या तत्त्वांची पुनर्घटना डॉ. रा. गो. भांडारकर यांनी आपल्या काही सहका-यांच्या मदतीने केली. त्यांनी मांडलेली सहा तत्त्वे उपनिषद तत्त्वज्ञानाला अधिक जवळची असून न्यायमूर्ती रानडयांच्या ३९ कलमातील सार त्यांत आले आहे.

प्रार्थना समाजाची ही सहा मूलतत्त्वे अशीः

१. परमेश्वराने हे सर्व ब्रह्मांड निर्माण केले आहे. तोच खरा देव. तो एकच, नित्य, अनंत, निराकार, आनंदमय.

२. केवळ त्याच्याच उपासनेने इहपरलोकी शुभ प्राप्त होते.

३. त्याच्या ठिकाणी पूज्यत्वबुध्दी व अनन्यभाव ठेवून त्याचे मानसिक भजन- पूजन करणे,

त्यास प्रिय अशी कृत्ये करणे हीच त्याची खरी उपासना.

४. प्रतिमा व इतर सृष्ट पदार्थ यांची पूजाअर्चा किंवा आराधना करणे हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे.

५. परमेश्वर सावयवरुपाने अवतार घेत नाही आणि कोणताही एक ग्रंथ साक्षात ईश्वरप्रणीत नाही.

६. सर्व मनुष्ये एका परमेश्वराची लेकरे आहेत, म्हणून भेद न राखिता परस्परांशी बंधुभावाने वागावे. हे ईश्वरास प्रिय आणि मनुष्याचे कर्तव्य आहे.

प्रार्थना समाजाच्या आध्यात्मिक भूमिकेविषयी डॉ. भांडारकरांनी विवरण केले आहे. प्रार्थना ही आत्मोन्नतीसाठी असते. प्रार्थनेमुळे परमेश्वराच्या सान्निध्यात मन तल्लीन होते. अन्नवस्त्रादी बाह्य वस्तू प्रार्थनेत मागावयाच्या नसतात तर पवित्रता, सद्भाव या आध्यात्मिक वस्तू मागावयाच्या असतात. प्रार्थनेमुळे विकाराचे निरसन होते. विवेक जागृत होतो. वृत्ती निर्वैर होते. साधुसंतांचा असाच अनुभव आहे. आध्यात्मिक आत्मोन्नतीचा मार्ग म्हणून प्रार्थना समाजाने प्रार्थनेचा पुरस्कार केलेला आहे.

प्रार्थना समाजाच्या स्थापनेनंतर साप्ताहिक उपासनांपेक्षा समाजाकडून प्रारंभी फारसे वेगळे काम होते नव्हते. समाजाचे प्रथम आचार्य श्री. भिकोबा दादा चव्हाण यांनी १८७६ मध्ये थीइस्टिक असोसिएशनच्या वतीने मुंबईत चिखलवाडी येथे रात्रीची पहिली शाळा उघडली व पुढील आठ- दहा वर्षांत अन्य चार ठिकाणी रात्रीच्या शाळा उघडल्या. श्री. बा. बा. कोरगावकर यांनी १८९० मध्ये मदनपुऱ्यात के. आनंदराव यांना मदतीला घेऊन अस्पृश्यांसाठी एक शाळा उघडली. या कामाचा बोभाटा होऊ नये अशी के. आनंदराव यांची अट होती. समाजाच्या उत्सवाच्या वेळेस अस्पृश्य मुलांच्या जोडीने मिठाई घेण्यास स्पृश्य विद्यार्थ्यांनी नकार दिला. अस्पृश्यांमध्ये काम करणे या काळात कठिण होते याची कल्पना या प्रसंगावरून येते.

श्री. सदाशिव पांडुरंग केळकर यांची प्रार्थना समाजाच्या धर्ममताचा प्रचार करण्यासाठी १८८२ मध्ये नेमणूक झाली. श्री. केळकर या कामाला फार लायक, निःस्पृह व उत्तम मराठी लिहिणारे गृहस्थ होते. त्यांनी सुबोध पत्रिकेत लेख लिहिले. त्यांनी सुरू केलेल्या संगतसभा, भजन व ग्रंथवाचन या चळवळी फारशा चालू राहिल्या नाहीत. स्त्रियांची आठवडी सभा व त्यांना इंग्रजी शिकवण्याचे त्यांनी तीन वर्ग चालवले. त्यांनी १८९४ मध्ये प्रार्थना समाजाचे प्रचारकपद सोडून बाह्य धर्मप्रचारक म्हणून स्वतंत्र काम करण्याचा मनोदय जाहीर केला. प्रार्थना समाजाने आतापर्यंत पांढरपेशा वळणाचेच काम केलेले दिसून येते. स्त्रियांच्या सभा

भरवून त्यांना सामान्य ज्ञान देणे, त्यांना इंग्रजी शिकविणे एवढेच सामाजिक स्वरूपाच्या कामाचे धोरण होते

या पार्श्वभूमीवर विठ्ठल रामजी शिंदे यांनी धर्मप्रचारक या नात्याने कामाला प्रारंभ केला. त्यांचे कार्यक्षेत्र प्रांतापुरते होते. पुणे, सातारा, अहमदनगर येथे प्रार्थना समाज होते., परंतु ते स्वतंत्र होते. समाजाची मध्यवर्ती घटना नव्हती.

शिंदे यांनी कार्याला प्रारंभ केला तेव्हा प्रार्थना समाजाच्या आद्य संस्थापकांपैकी डॉ. भांडारकर सोडल्यास कोणी हयात नव्हते. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस डॉ. आत्माराम पांडुरंग (१८९८), भास्कर हरी भागवत (१८९४), तुकाराम तात्या पडवळ (१८९८) शंकर पांडुरंग पंडित (१८९४), न्या. रानडे (१९०१), मामा परमानंद व वामन आबाजी मोडक (१८९७) ही मंडळी दिवंगत झाली होती. डॉ. भांडारकरांचे वास्तव्य पुण्यास होते. सर नारायणराव चंदावरकर यांच्यावरच मुंबई प्रार्थना समाजाचे नेतृत्व करण्याची जबाबदारी येऊन पडली होती.

धर्मप्रचारक म्हणून शिंदे यांच्या कामाचे दोन भाग पडतात. एक आचार्य कार्य., दुसरे प्रचार कार्य. उपासना करणे, सभासदांच्या धर्माचरणाची निगा राखणे, नामकरण, उपनयनादी गृहविधी चालविणे, सभासदांत परस्परपरिचय व्हावा, प्रेम वाढावे यांसाठी स्नेहसंमेलने घडविणे हे आचार्यकार्यात मोडते. प्रचारकार्यातही त्यांनी कल्पकता, संघटनाकौशल्य दाखविले. युरोपात असताना त्यांनी युनिटेरियन स्त्रियांनी चालविलेल्या पोस्टल मिशनचे काम पाहिले होते. त्याच धर्तीवर भारतातही हे काम सुरु व्हावे असे त्यांना वाटले व पुण्यातील त्यांचे समाजबंधू आणि मित्र श्री. वासुदेवराव सुखटणकर यांना त्यांनी तसे कळविले. या कामाची घटना ते भारतात येण्याच्या आधीच झाली. ब्राह्म धर्मविषयक पुस्तिका, पत्रके लिहून टपालाद्वारा त्यांचा प्रसार करणे, जिज्ञासूस भेटीस बोलावून त्यांच्याशी चर्चा करणे वा त्यांच्याशी पत्रव्यवहार ठेवणे असे या कामाचे स्वरूप होते. अण्णासाहेबांनी श्री. सुखटणकर व त्यांचे मित्र आणि समाजबंधू श्री. सय्यद अब्दुल कादर यांच्या मदतीने हे काम जोराने केले. दहा वर्षाच्या काळात त्यांनी ब्राह्मधर्मावरील ३४३८ पुस्तके, १२७०० पत्रके, ६३३ युनिटेरियन पुस्तके व ५००० युनिटेरियन पत्रके प्रसृत केली. "प्रार्थना समाज हे काय प्रकरण आहे ?" हे चोपडे अशांपैकी आहे. हायस्कुलातील व कॉलेजातील तरुण विद्यार्थ्यांना मौलिक धर्मग्रंथ वाचण्याची गोडी लागावी., सवय व्हावी यासाठी उदार धर्मग्रंथ वाचन वर्ग (लिबरल रिलिजन रीडिंग क्लास) काढला. हा वर्ग दर बुधवारी सायंकाळी प्रार्थना मंदिरात भरत असे. आर्मस्ट्रॉंग, प्रो. डायसन् इमर्सन यांच्या पुस्तकांचे तेथे अध्ययन होई, जाहीर व्याख्याने होत असत.

ब्राह्मधर्माच्या तत्त्वानुसार सभासदांचे गृह्यसंस्कार व विधी फार कमी चालत असे. तरुणांनी अनुष्ठान करण्यास,उपासना चालविण्यास शिकावे,परस्पर कुटुंबात मिसळावे,स्नेहवर्धन व्हावे यासाठी तरुण ब्राह्मसंघ (यंग थीइस्ट युनियन) ही संस्था त्यांनी १९०५ मध्ये दस-याच्या दिवशी काढली.

त्याशिवाय मजुरांसाठी रात्रीच्या शाळा दहाबारा चालविल्या जात त्यावर देखरेख करणे, सुबोधपत्रिकेसाठी लेखन करणे ही कामे ते करीत असत. ही कामे सांभाळून मुंबई प्रांतात आणि बाहेरही ते धर्मप्रचारार्थ दौरे करीत. सातारा,नगर,कोल्हापूर,इंदूर,मंगळूर,इ. ठिकाणी त्यांनी धर्मप्रचारार्थ दौरे काढले.

अण्णासाहेब कीर्तनेही करीत. दि. १६ नोव्हेंबर १९०९ ला कोल्हापुरास जगद्गुरु शंकराचार्य यांच्या संस्थानात अण्णासाहेबांनी कीर्तन केले. श्रींनी अण्णासाहेबांना आपणांस ब्राह्मतत्त्वे पसंत वाटतात असे सांगितले.

ब्राह्ममताचा प्रचार केवळ मुंबई इलाख्यात करण्याने अण्णासाहेबांना समाधान वाटत नव्हते. भारतभर ब्राह्ममताचा प्रचार करण्याच्या दृष्टीने त्यांनी प्रयत्न केले. न्या.मू.रानडे यांनी राष्ट्रीय सभेच्या वेळेसच भारतीय एकेश्वरी परिषद भरविली जावी असे प्रयत्न केले होते. परंतु त्यात सातत्य राहिले नव्हते. ही धर्मपरिषद पुन्हा संघटित करण्याचा निश्चय अण्णासाहेबांनी केला व १९०४ पासून १९१३ पर्यंत धर्मपरिषदेची अधिवेशने राष्ट्रीय सभेच्या वेळी त्यांनी प्रयत्नपूर्वक नियमितपणे भरविली. चिटणीस या नात्याने त्यांनी या कामाचा भार उचलला.

भारतातील ब्राह्म समाज, प्रार्थना समाज अशा एकेश्वरी धर्माची माहिती एकत्र करून अण्णासाहेबांनी ब्राह्मधर्म सूचिग्रंथ (थीइस्टिक डिरेक्टरी) हा ग्रंथ १९१२ मध्ये सिध्द केला. भारतातील वेगवेगळया स्थानिक समाजाची अद्यावत माहिती यात ग्रथित केली आहे. हा ग्रंथ दोन भागात विभागला आहे. पहिल्या भागात जगातील उदार धर्माच्या निरनिराळया पंथांची माहिती व कार्य यासंबंधी लेख आहेत, व दुस-या भागात भारतातील एकूण १६८ संस्थांची तपशीलवार माहिती आहे. अशा प्रकारचा ग्रंथ तयार करण्यात त्यांची प्रचारक म्हणून दूरदृष्टी दिसते.

श्री.बी.बी.केसकर यांनी १९१२ मध्ये "श्री.वि.रा.शिंदे यांचे धर्मपर लेख, व्याख्याने व उपदेश" हा ग्रंथ संपादित करून प्रसिध्द केला आहे. या ग्रंथावरून विठ्ठल रामजी शिंदे यांचा धर्मविचार किती प्रगल्भ आहे, त्यांची प्रतिपादनाची हातोटी किती परिणामकारक आहे याची तर कल्पना येतेच, शिवाय सहाआठ वर्षाच्या काळात त्यांनी किती प्रवास केला, किती व्याख्याने दिली हे लक्षात येऊन त्यांची उद्योगशीलता व कामावरची अनन्यनिष्ठा यांचाही प्रभाव

आपल्या मनावर पडतो.

ब्राह्ममताचा प्रसार करण्याचे काम अण्णासाहेब शिंदे मोठया हिरीरीने, निस्वार्थीपणाने, कल्पकता दाखवून आणि अंतः प्रेरणेने करीत होते. परंतु त्यांना १९१० मध्ये समाजाशी असलेला पगारी प्रचारक म्हणून संबंध सोडावा लागला. हे कसे घडले ते आपण पाहू.

प्रार्थना समाजाचे धर्मप्रचारकपद स्वीकारल्यापासून वर्ष दीड वर्षाच्या अवधीत त्यांनी जोडीनेच दुस-या एका क्रांतिकारक आणि प्रचंड कार्याला आरंभ केला. हे काम म्हणजे अस्पृश्य मानल्या गेलेल्यांची उन्नती करण्याचे. या कामाला व्यापक आणि शिस्तशीर रूप देण्यासाठी त्यांनी डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया अथवा भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळी ही संस्था १९०६ मध्ये स्थापन केली. पहिल्या तीन वर्षाच्या काळातच मिशनने आपल्या कामाचा फार मोठा झपाटा मारला. मुंबई येथे अस्पृश्यांसाठी परळ, देवनार, मदनपुरा, कामाठीपुरा येथे व मुंबईच्या बाहेर पुणे, मनमाड, इगतपुरी, इंदूर, अकोला, अमरावती, दापोली, मंगळूर, मद्रास, नाशिक, महाबळेश्वर येथे मिशनच्या शाखा काढून वेगाने काम सुरू केले.

अण्णासाहेबांचे हे काम चालू असताना मुंबई प्रार्थना समाजात त्यांच्याबद्दल असमाधान निर्माण होत होते. समाजाच्या प्रचारकाने अमक्या नियमाप्रमाणे वागावे, वेळोवेळी कामाचे अहवाल पाठवावेत, रोजनिशी ठेवावी असे किरकोळ वाद धुमसत होते. या किरकोळ वरवरच्या तक्रारींच्या मुळाशी खरी कारणे वेगळीच होती. अण्णासाहेबांनी आपल्या आत्मचरित्रात कोणाहीबद्दल कडवटपणे लिहिलेले नाही. त्यांनी एवढेच म्हटले आहे की, "ही कामे लेखी नियमांच्या चौकटीत बसविणे आणि त्यावर आग्रह धरणे मला परवडेना. हयामुळे मी रंजीस येऊ लागलो. समाजाचे काम मी माझे आध्यात्मिक काम म्हणून म्हणून पत्करले होते. एखाद्या ऐहिक नोकरीप्रमाणे राजीनामा देऊन सुटून जाणे मला इष्ट वाटेना. ज्या नोकरीचा मी अर्ज केला नव्हता ती कशी संपणार ?" यातून त्यांना एकच मार्ग दिसला. तो म्हणजे प्रार्थना समाज त्यांना जे दरमहा रुपये साठ असे अल्प वेतन देत असे ते न स्वीकारणे. तसे त्यांनी केले. त्यानंतर १९१० च्या नोव्हेंबरमध्ये समाजाच्या कमिटीने ठराव करून त्यांचा समाजाशी प्रचारक म्हणून असलेला संबंध संपल्याचे कळविले.

विठ्ठल रामजी शिंदे व मुंबई प्रार्थना समाज यांच्यामध्ये हा दुरावा का निर्माण झाला ? त्याची कारणे मुंबई प्रार्थना समाजाच्या मवाळ, पांढरपेशा धोरणातच पाहावी लागतात. शिंदे यांनी आपल्या खासगी डायरीत १७ जानेवारी १९३५ ला नोंद केली आहे ती अशी : "माझे व मुंबई प्रार्थना समाजाचे सहकार्य आज जवळ जवळ २०/२५ वर्षे बंद पडले होते. कारण

१.राजकारण,२.मी स्वतंत्र,"अस्पृश्यां" साठी मिशन काढले,३.माझा स्वतंत्र व सरळ बहाणा."

मिशन स्थापन करण्याच्या कामी शिंद्यांना समाजाचे अध्यक्ष सर नारायणराव चंदावरकर, उपाध्यक्ष शेट दामोदर दास सुखडवाला यांनी सहकार्य केले होते. श्री. द्वा. गो. वैद्य, बी. बी. केसकर, बा. बा. कोरगावकर यांच्यासारखे स्नेही समाजात होते. परंतु व्यक्तिगत स्नेहसंबंध आणि समाजाचे धोरण या दोन बाबी स्वतंत्र होत्या.

मुंबई प्रार्थना समाजावर ठसा होता तो पांढरपेशा वळणाचा. प्रार्थना समाजातील कर्त्या मंडळींचे राजकीय धोरण होते ते मवाळ सरकारची यत्किंचितही इतराजी आपल्यावर होऊ नये यासाठी ते दक्ष होते. त्यांना सुधारणेची आवड होती खरी. परंतु प्रार्थनासमाजाच्या कार्यात मुख्य स्थान धर्माला, गौण स्थान सुधारणेला आणि त्या सुधारणाही प्राधान्याने पांढरपेशा वळणाच्या. विधवाविवाहाला वा आंतरजातीय विवाहाला प्रोत्साहन द्यावे, समाजिस्टांच्या कुटुंबातील स्त्रियांना सर्वसाधारण ज्ञान देण्यासाठी, इंग्रजी शिकवण्यासाठी वर्ग चालवावे यांसारख्या. समाजाच्या प्रचारकाचे धर्मप्रचारापेक्षा अस्पृश्यांची उन्नती करण्याच्या कामी आपला बराचसा वेळ आणि शक्ती खर्च करणे समाजाला पसंत पडले नसावे. शिंद्यांनी तर मिशनचा व्याप अवाढव्य वाढविला होता. त्यांच्या दृष्टीने अस्पृश्यता निवारणाचे कार्य हे धर्मकार्य हाते. त्यांची धर्मकल्पना मुंबई समाजिस्टांपेक्षा वेगळी होती. कशी ते आपण पाहू:

अण्णासाहेबांवर त्यांच्या घरातील भागवत संप्रदायाचे संस्कार झाले होते. १८९८ साली ते फर्ग्युसन कॉलेजात शिकत होते तेव्हा त्यांनी एक रोजनिशी लिहिली आहे. या कालखंडातच त्यांच्या मनाने प्रार्थना समाजाची दीक्षा घेण्याचा निश्चय केला होता. याच कालखंडात आपण म्हार- मांग या अतिनीच मानल्या गेलेल्या लोकांसाठी काही एक करावयास पाहिजे अशी तळमळ त्यांच्या मनाला लागून राहिली होती. या दोन्ही गोष्टी त्यांच्या उन्नत आध्यात्मिक वृत्तीचा आविष्कार करणा-या होत्या. धर्मकार्य आणि समाजसुधारणा या दोन बाबी त्यांच्या दृष्टीने वेगळया नव्हत्या. एवढेच नव्हे तर उन्नत मनोवृत्तीने केला जाणारा लौकिक व्यवहार आणि धर्मभावना यांतही ते फरक करीत नव्हते. ईश्वरनिष्ठ असणे म्हणजे एकांतात ध्यानधारणा करणे अथवा समुदायात उपासना चालविणे अशी त्यांची संकुचित धर्मकल्पना नव्हती. अध्यात्म आणि उन्नत हेतूने केलेले सामाजिक- राजकीय कार्य यांमध्ये त्यांच्या दृष्टीने अभेद होता. त्यांच्या मते धर्मभावना आणि अन्य लौकिक भावना या वेगळया जातीच्या नव्हत. आपली ही धर्मकल्पना त्यांनी १९३० मध्ये तुरूंगात असताना लिहिलेल्या रोजनिशीत विशद केली व तिचा पुनरुच्चार आत्मचरित्रातही केला. ते लिहितात : "लहानपणी मुलांची खेळाची आवड, तरुणपणी तरुणींसंबंधी उदात्त रस आणि म्हातारपणी एखाद्या बाबतीतील सात्त्विक चिंतामग्नता ह्या तिन्ही भावनांहून भक्तीची भावना तत्त्वतः अगदी भिन्नच आहे असे म्हणता

येणार नाही. ह्या भावनांत जी वयपरत्वे अंतःकरणाची परिणती होत जाते तीच किंचित आणखी थोडी जास्त शुध्द, जास्त व्यापक आणि जास्त जोरदार झाली की तिला आम्ही भक्ती हे नाव देतो. ऐहिक रस आणि पारमार्थिक रस यांना मी एकाच माळेत गोवतो." त्यांच्या धर्मकल्पनेत निवृत्ती आहे, व ते श्रध्देच्या जोडीनेच निर्लोभ प्रेमाचा समावेश धर्मकल्पनेत करतात. प्रेमाचे स्वरूप सांगताना ते म्हणतात, " प्रेम म्हणजे, उत्साह; उदासीनता नव्हे." समाजसेवेलाही या प्रेमाचेच अधिष्ठान असल्याचे ते सांगतात. त्यांच्या दृष्टीने प्रपंचातील प्रत्येक व्यवहार जागृतपणे आणि प्रेमाने करणे म्हणजे धर्मसाधन होय. "एखादा प्रामाणिक सुतार, हुशार न्हावी, विशेषतः प्रेमळ भंगी देखील पोटभरू पुरोहितापेक्षा शतपटीने धार्मिकच म्हणता येणार नाही काय ?"

राजा राममोहन रॉय यांच्याबद्दल महर्षी शिंदे यांच्या मनात अतीव आदर होता. त्यांच्या धर्मनिष्ठेचे स्वरूप सांगताना ते म्हणतात, "त्याचा धर्म म्हणजे केवळ एक मत किंवा मनोवृत्ती नसे, तर साक्षात जीवन होते; व ते जीवनही सर्व बाजूचे असे. राजकारण आणि आर्थिक अभ्युदय, धर्मसुधारणा आणि समाजसुधारणा, ह्या सर्वांसाठी त्याचे जिणे त्याचा प्रयत्न व त्याचे मरण ही घडली" महर्षी शिंदे यांची धर्मकल्पना अशीच सर्व बाजूची, सारे जीवन व्यापून टाकणारी होती. जीवनाची सारी अंगे उंचावू पाहणारी होती. त्यांची जीवनदृष्टी व जीवनकार्य ही धर्मरूपच होती.

त्यांची ही धर्मभावना लक्षात घेतल्यावर त्यांच्या जीवितकार्याचे आकलन अधिक सुलभ होते. लहानपणीच भागवतधर्माचे उदार संस्कार त्यांच्या मनावर झालेले होते. म्हणून मूर्तिपूजा हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे असे सांगणारा, अवतारवाद व ग्रंथप्रामाण्यवाद मान्य नसणारा व सर्व मनुष्ये एका परमेश्वराची लेकरे आहेत म्हणून भेद न राखता परस्परांशी बंधुभावाने वागावे असे सांगणारा एकेश्वरवादी उदार ब्राह्मधर्म त्यांच्या मनाला भावला व ते त्याकडे आपोआप ओढले गेले. त्यांनी आयुष्यभर ह्या उदार धर्माच्या प्रचाराचे कार्य केले. मानवनिर्मित भेदभावाला व उच्चनीचतेला त्यांच्या मनात जागा नव्हती. म्हणून अस्पृश्यता नष्ट करण्याच्या कामी व अस्पृश्य मानलेल्यांची सर्वांगीण उन्नती करण्यासाठी त्यांनी स्वतःचे आयुष्य वाहून घेतले. हे काम त्यांच्या दृष्टीने धर्मकार्यच होते. त्यांनी स्पष्ट नमूदही केले आहे, " अस्पृश्यतानिवारण हा तर माझ्या धर्मकार्याचा भाग." त्यांच्या दृष्टीने प्रार्थना समाजाचे धर्मप्रसाराचे काम हे जसे धर्मिक कार्य तसेच अस्पृश्यता निवारणाचे कार्यही धार्मिकच होते. म्हणूनच त्यांनी धर्मप्रचाराच्या जोडीने अस्पृश्यता निवारणाच्या कामालाही हात घातला व ते काम मोठया प्रमाणात वाढविले. त्यांच्या या कार्याचे स्वरूप आपण पुढील प्रकरणात बघू.

# अस्पृश्यता निवारणाचे कार्य

अस्पृश्यता निवारणाचा व अस्पृश्य समजल्या जाणा-या वर्गाची उन्नती करण्याचा पहिला युगप्रवर्तक प्रयत्न महात्मा जोतीबा फुले यांनी एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला केला, हे आपणाला ठाऊक आहेच. पुण्यामध्ये त्यांनी १८५१ मध्ये अस्पृश्य मुलांसाठी पहिली शाळा उघडली. परंतु म. फुल्यांचे हे प्रयत्न लवकरच खंडित झाल्याचे दिसून येते. याबाबत फुले उणे पडत नसून तत्कालीन समाजस्थितीकडेच याचा दोष जातो, असे म्हणावे लागेल. म. फुले यांच्यापुढे ब्राह्मण जातीतील विधवांपासून तो नाडल्या जाणा-या शेतक-यांपर्यंतचे प्रश्न सोडविण्याचे अफाट काम उभे होते. अस्पृश्यांची सुधारणा करण्याच्या कामी फुले यांना तत्कालीन अन्य पांढरपेशा समाजसुधारकांनी साथ दिल्याचे दिसून येत नाही. महाडचे श्री. रामजीबुवा वलंगकर, श्री. शिवराम जानबा कांबळे हे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या काळातील अस्पृश्यांचे पुढारी होते. त्यांनी सामाजिक अन्यायाविरुध्द उभे राहाण्यापेक्षाही अस्पृश्यांना सैन्यात नोकरी मिळण्याची सवलत सुरू व्हावी यासाठीच प्रामुख्याने प्रयत्न केल्याचे दिसते. मुंबई प्रार्थना समाजाने अस्पृश्य मुलांसाठी रात्रीच्या एकदोन शाळा एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस उघडल्या एवढेच मुंबईतील या बाबतीतील कार्य. बंगालमध्ये शशिपद बानर्जी यांनी १८६५ च्या सुमारास अस्पृश्यवर्गाची स्थिती सुधारण्याचे काही प्रयत्न केले होते. श्री. सयाजीराव महाराजांनी बडोदा संस्थानात १८८३ पासून अस्पृश्यवर्गासाठी शाळा काढावयास सुरुवात केली होती. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस त्यांच्या राज्यात अशा एकंदर बावीस शाळा होत्या. मात्र त्यांचा हा प्रयत्न स्वाभाविकपणेच बडोदा संस्थानापुरता होता. थिऑसॉफिकल सोसायटीचे अध्यक्ष कर्नल अल्कॉट यांनी १८९४ मध्ये मद्रास शहरी अस्पृश्यता निवारण्याचा उपाय म्हणून एका झोपडीत शाळा काढली. आणखी दोन शाळा पुढील वर्षात उघडल्या. मात्र भारतात वेगवेगळ्या ठिकाणी चालू झालेल्या या प्रयत्नांचे स्वरूप स्थानिक होते. एकाच्या प्रयत्नाची माहिती दुस-यास नव्हती. हे सगळे प्रयत्न अस्पृश्यांवरील सामाजिक अन्याय दूर करण्याच्या हेतूपेक्षा

त्यांना शिक्षित करणे हाच हेतू मुख्य ठेवून सुरू झाले होते. सारांश, अस्पृश्य वर्गावर शतकानुशतकांपासून होणा-या सामाजिक अन्यायाबाबत विसाव्या शतकाच्या प्रारंभी सर्वथैव मौन पाळले जात होते. भारतामध्ये अस्पृश्यतेचा भयंकर प्रश्न अस्तित्वात आहे याची सार्वत्रिक पातळीवर कोणाला जाणीव असल्याचे दिसत नाही. अशा या काळात अस्पृश्यांवर होणा-या प्रचंड सामाजिक अन्यायाविरुध्द भारतभर आवाज उठविण्याचे व अस्पृश्य समजल्या जाणा-या वर्गाच्या उन्नतीसाठी संस्थात्मक प्रयत्न करण्याचे महनीय कार्य विठ्ठल रामजी शिंदे यांनी सुरू केले. या कामाला अखिल भारतीय पातळीवर नेण्याची दूरदृष्टी व कर्तेपणा महर्षी शिंदे यांनी दाखविला.

अस्पृश्य समजल्या जाणा-या वर्गाबद्दल त्यांच्या अंतःकरणात विद्यार्थी दशेपासून कळकळ होती व अस्पृश्यता निवारणासाठी आपण झटावे असे त्यांना वाटत होते. त्यांच्या १८९८ सालच्या रोजनिशीतील रा. कळसकर यांच्याबद्दलची त्यांची नोंद या गोष्टीची निदर्शक आहे. विलायतेहून परत आल्यानंतर प्रार्थना समाजाच्या कामानिमित्त सर्व हिंदुस्थानचा दौरा त्यांनी केला. त्यांच्या या दौ-यात अस्पृश्य वर्गाच्या स्थितीचे त्यांनी अवलोकन केले होते. डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया अथवा भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळीची स्थापना करण्याची आंतरिक प्रेरणा अण्णासाहेबांना कशी झाली हे त्यांच्या चरित्रातील एका प्रसंगावरून लक्षात येते. १९०५ च्या उन्हाळयातील एका अमावस्येच्या रात्रीची ही घटना. अण्णासाहेब दौरा करीत असताना अहमदनगरला मुक्कामाला होते. नगर जिल्हयातील श्री. श्रीपतराव थोरात व श्री पांडुरंग लक्ष्मण डांगळे इ. अस्पृश्य वर्गातील पुढा-यानी भिंगार या गावी सभा बोलाविली होती. त्या सभेला अण्णासाहेबांना त्यांनी बोलावून नेले. नागपूरकडील श्री. किसन फागूजी बंदसोडे यांनी स्थापिलेल्या सोमवंशी हितचिंतक समाजाचे छापील पत्रक वाचून त्यातील उद्देश ते सभेत समजावून सांगत होते. हजारो वर्षे वरिष्ठ जातीचा जुलूम सहन करणा-या या मंडळीच्या पत्रकातील एक उद्देश, वरिष्ठ वर्गाची मने न दुखविता अस्पृश्यांनी आपल्या उध्दाराचा प्रयत्न करावा असा होता. हा उद्देश समजावून सांगताना आपल्या मनाची स्थिती कशी झाली त्याचे अण्णासाहेब वर्णन करतात. "हे उध्दाराचे काम आपण स्वतः अंगावर घेऊन, या कामात स्वतः चे भावी चरित्र वाहून घ्यावे अशी प्रेरणा मला जोराने होऊ लागली. इतर सर्व कामे टाकून एका घडीचाही वेळ न दडवता हया कार्यास लागावे असा संकल्प परमेश्वरास स्मरून हयाच रात्रीच्या मुहुर्तावर केल्याचे मला पक्के आठवते."

अस्पृश्यांच्या स्थितीचे भारतभर अवलोकन केल्यानंतर मुंबई येथे सामाजिक सुधारणा मंडळापुढे (सोशल रिफॉर्म असोसिएशन) १९०६ मध्ये त्यांनी इंग्रजीत एक व्याख्यान दिले व त्या व्याख्यानाची इंग्रजीत एक पुस्तिका प्रसिध्द केली. तीमध्ये हिंदुस्थानातील बहिष्कृत

वर्गाच्या अडचणी, त्यांची प्रांतवार संख्या, वरिष्ठ वर्गाकडून होणारे सुधारणेचे प्रयत्न, त्यांचे स्वोध्दारार्थ होणारे प्रयत्न यांची व्यवस्थेशीर मांडणी केली. या व्याख्यानाच्या शेवटी त्यांनी असे म्हटले, "हया लोकांच्या उध्दारासाठी नुसती शिक्षण- संस्था, मग ती कितीही मोठी असो, स्थापून चालावयाचे नाही, तर ज्यामध्ये जिवंत व्यक्तिगत पुढाकार आहे असे मिशन तयार झाले पाहिजे. अशा मिशनने ख्रिस्ती मिशनच्या प्रमाणे हया लोकांच्या जीवितामध्ये क्रांती व विकास घडवून आणला पाहिजे." हाच हेतू मनामध्ये ठेवून त्यांनी १८ ऑक्टोबर १९०६ मध्ये डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया अथवा भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळाची स्थापना केली. मुंबई येथील एल्फिन्स्टन रोडलगतच्या मुरारजी वालजी यांच्या बंगल्यात अस्पृश्य मुलांसाठी शाळा उघडून या कार्याला आरंभ करण्यात आला. सर नारायणराव चंदावरकर यांनी पहिला धडा घालून दिला. तेच मिशनचे अध्यक्षही होते. या प्रसंगी केलेल्या भाषणात त्यांनी महत्त्वाचा विचार सांगितला. ते म्हणाले, "ह्या नीच मानलेल्या लोकांना वर आणण्याचा प्रयत्न करण्याने आम्ही स्वतःलाच वर आणीत आहोत. हे पवित्र कार्य करीत असता हया लोकांचा आम्ही उध्दार करणार हा घमेंडीचा विचार आमच्या अंतःकरणात न शिरो."

'बहिष्कृत भारत' या १९०९ मध्ये लिहिलेल्या प्रदीर्घ लेखामध्ये त्यांनी या प्रश्नाचे स्वरूप व त्याबद्दलची स्वतःची भूमिका विस्ताराने मांडली आहे. लेखाच्या प्रारंभीच अस्पृश्यता म्हणजे नीच मानलेल्या जातीवरचा भयंकर बहिष्कार आहे असे ते सांगतात. हा बहिष्कार कोणावर? अत्यंजावर की त्यांच्यामध्ये असलेल्या हिंदुधर्मावर? ते म्हणतात, "ईश्वराने निर्माण केलेला असा कोणताही प्राणी नाही की तो अस्पर्श्य मानला आहे. मनुष्य प्राण्यांपैकी मात्र यांना बाहेर ठेवले जाते. महाराच्या कुत्र्याला आम्ही शिवू पण महाराला नाही. त्याने हिंदूपण टाकले म्हणजे शिवतो." ह्या विसंगतीमुळेच शिंदे म्हणतात, की आपला बहिष्कार त्यांच्यामध्ये असलेल्या हिंदुधर्मावरच ठरतो.

यांना अस्पृश्य का मानायचे? हे वेगळे थोडेच आहेत? मराठे वगैरे जातींशी यांचे साम्य आहे. अनेक जातीची भेसळ त्यांच्यामध्ये दिसते. काठेवाडात भंग्याचे सहा पोटभाग आहेत. त्या सर्वांची नावे अस्सल रजपुतांची आहेत. उदा. परमार, राठोड, सोळंकी, इत्यादी. महाराष्ट्रातील महारांमध्येही मराठ्यांच्या अस्सल ९६ कुळीपैकी ब-याच कुळींची नावे आढळतात. जाधव, साळुंखे, चालुक्य, पवार, मोरे, गायकवाड, शेलार, साळवी, सूर्यवंशी इत्यादी. त्यांच्या भाषेत काही फरक आहे का? महाराष्ट्रातील महारांची भाषा पाहिली असता त्यांचे उच्चार, स्वर व एकंदर बोलण्याची ढब मराठा कुणब्यासारखी आहे असे दिसून येते. यांच्या देव्हा-यावर खंडोबा, बहिरोबा, भवानी वगैरे मराठ्यांच्याच देवतांच्या मूर्ती दिसतात.

नाशिक,पैठण,पंढरपूर,तुळजापूर इ. क्षेत्रांच्या ठिकाणी इतरांबरोबर यांचीही गर्दी असते,आणि वारकरी वगैरे धर्मसंप्रदाय मराठ्यांप्रमाणे यांच्यातही पूर्वीपासून चालू आहेत. महार हे मराठ्यांचे सख्खे नसले तरी दूरचे चुलतभाऊ होत असे त्यांनी अन्यत्र म्हटले आहे व अस्पृश्य हे एकेकाळी राजवैभव भोगलेले राजे होत असाही निष्कर्ष त्यांनी काढलेला आपणांस पाहावयास मिळेल.

हिंदू समाम जाकडून अंत्यजांना मिळणारी वागणूक अन्यायाची व कठोरपणाची होती. परंतु न्यायी समजल्या जाणा-या इंग्रज सरकारचा दृष्टिकोण कसा होता ? म. शिंदे लिहितात, हल्लीच्या सर्व बाजूंनी होणा-या प्रगतीच्या मानाने व इंग्रज सरकारच्या सत्तेच्या, संपत्तीच्या आणि शहाणपणाच्या मानाने पाहता ह्या लोकांची जी दाद लागत आहे ती फारच अल्प होय. मिठावरचा आणि जमिनीवरचा कर,जकात आणि दुस-या अशाच सर्वसाधारण कराची वसुली करतेवेळी सरकार अमुक जाती उच्च आणि अमुक जाती नीच हा भेद पहात नाही. पण असे असूनही न्यायकोर्टे, दवाखाने, शाळा, पोस्ट ऑफिसे इ. सार्वजनिक जागी नीच मानलेल्या वर्गास उच्च म्हणविणा-याचे दृष्टीने वागविण्यात येते. त्यामुळे हया आधीच रंजलेल्या बापड्यांस अनेक अपमान, अडचणी आणि पुष्कळ वेळा अन्यायही सोसावे लागतात." मग ते ब्रिटिश सरकारला सवाल करतात की, कर घेतेवेळी सरकार जी समदृष्टी ठेवते ती प्रजापालनाच्या वेळी का ठेवीत नाही ?

त्यांना दुसरेही भविष्य दिसत होते. त्यांनी १९०१ च्या खानेसुमारीचे आकडे आधाराला घेऊन विश्लेषण केले आहे. एकूण साडे ३१ कोटी लोकसंख्येपैकी सहा कोटी मुसलमान व साडे वीस कोटी हिंदू. त्यांपैकी साडे पाच कोटी अंत्यज. म्हणजे एक षष्ठांशा पेक्षा जास्त अंत्यज,बहिष्कृत लोक आहेत. मुख्य प्रश्न साडे पाच कोटी प्रजेने हीन स्थितीत राहावे काय ? हिंदू समाज सोवळेपणा सोडायला तयार नाही. तो उदासीन. मग या अंत्यजांनी ख्रिस्ती व्हावे काय ? मग चित्र असे होईल. पंधरा कोटी हिंदू,साडेपंधरा कोटी ख्रिश्चन,सहा कोटी मुसलमान. म्हणजे राष्ट्रीय दृष्ट्या आता जी हिंदूमुसलमानांची दुही आहे, तिच्याऐवजी वरील प्रकार घडलाच तर हिंदू,मुसलमान,ख्रिस्ती यांचा तिरपगडा होणार. पंधरा कोटी मवाळ हिंदू आणि तितकेच कडवे मुसलमान आणि ख्रिस्ती मिळून या तिघांचे सूत कसे जमावे ? शिंदे यांनी हा विचार धर्माभिमानाने मांडला नाही. कारण ते स्वतः हिंदूधर्माच्या पलीकडे गेलेले होते. ते विश्वधर्म मानणारे एकनिष्ठ ब्राह्म होते. त्यांना चिंता पडली होती ती अस्पृश्य गणल्या गेलेल्यांची स्थिती सुधारण्याची व हिंदी समाजात फुट पडू नये याची. म. शिंदे यांनी अस्पृश्यतेच्या प्रश्नाची 'बहिष्कृत भारत' या लेखात मांडणी केली ती या प्रकारची. हा वर्ग म्हणजे बहिष्कृत भारतच होय, असे त्यांनी शीर्षकाच्याद्वाराच वेधकपणे सांगून टाकले.

ह्या लोकांच्या जीवितामध्ये क्रांती व विकास घडवून आणण्यासाठी त्यांनी मिशनची स्थापना करून जोमाने कार्याला प्रारंभ केला. या प्रश्नासंबंधीचे त्यांचे आकलन दुहेरी आहे. म्हणून त्यांच्या कार्यालाही दोन पैलू आहेत. ही अस्पृश्यता आहे कोठे ? तर ती मानीव आहे. तिला वस्तुनिष्ठ आधार नाही. स्वतःला स्पृश्य समजणा-या लोकांनी काही जातीच्या ठिकाणी अस्पृश्यता आहे असे मानले. तांबड्या फुलाचा तांबडेपणा जसा फुलाच्या ठायी असतो तसे काही अस्पृश्यतेचे वस्तुनिष्ठ स्वरूप नसते. वरिष्ठ समजल्या जाणा-यांनी ही अस्पृश्यता मानली याचा अर्थ अस्पृश्यतेचे अस्तित्व त्या वरिष्ठ वर्णीयांच्या जाणिवेमुळे निर्माण झाले आहे असे ठरते. तेव्हा अस्पृश्यता नष्ट करावयाची असेल तर तथाकथित वरिष्ठ वर्णीयांच्या मनामधील ही भ्रामक जाणीव नष्ट करणे हा त्यांच्या कार्याचा एक भाग. .तर शतकानुशतके बहिष्कृत अवस्था लादल्यामुळे अस्पृश्य ठरवल्या गेलेल्या वर्गाला प्राप्त झालेला निकृष्टपणा नाहीसा करणे, त्यांच्या मनात स्वाभिमान निर्माण करणे, त्यांना सुशिक्षित व उद्योगी बनविणे हा त्यांनी आपल्या कार्याचा दुसरा भाग मानला होता. ह्या वर्गाचा आध्यात्मिक विकास साधणे त्यांना अभिप्रेत होते. म.शिंदे यांनी मिशनच्या द्वारा ही दोन्ही प्रकारची कामे अत्यंत प्रभावीपणे केली.

अस्पृश्य वर्गात शिक्षणाचा प्रसार करणे, त्यांना नोक-या मिळवून देणे, त्यांच्या सामाजिक अडचणींचे निवारण करणे आणि सार्वत्रिक धर्म, व्यक्तिगत शील आणि नागरिकता वगैरे गुणांचा हया गरीब लोकांत प्रसार करणे ही उद्दिष्टे डोळयासमोर ठेवून मिशनच्या कार्याला प्रारंभ करण्यात आला. मिशन स्थापन केल्यापासून पहिल्या तीन वर्षातच त्यांनी कामाचा प्रयंड पसारा वाढविलेला दिसतो. मुंबईमध्येच परळ, देवनार, मदनपुरा येथे मराठी शाळा काढल्या. कामाठीपुरा येथे रविवारच्या शाळा काढल्या. भजन समाज, व्याख्याने असे उपक्रम सुरू केले. जर्मन तज्ज्ञाच्या नेतृत्वाखाली नवीन त-हेचे बूट तयार करण्याचा कारखाना काढला. निराश्रित आजारी स्त्रियांची सेवा करण्यासाठी निराश्रित सेवासदन स्थापन केले. मुंबईबाहेर पुणे, मनमाड, इगतपुरी, इंदूर, अकोला, अमरावती, दापोली, मंगरूळ, मद्रास, महाबळेश्वर इ. ठिकाणी शाळा उघडल्या. मिशनच्या १९०९ पर्यंत १२ शाखा, दिवसाच्या १२ शाळा, ४ उद्योग शाळा काढल्या. त्यामध्ये १०१८ विद्यार्थी शिक्षण घेऊ लागले.७ आजीव कार्यवाहक मिळाले. श्री. वामन सदाशिव सोहोनी, श्री. सय्यद अब्दुल कादर, भगिनी जनाबाई हे आपल्या नोक-यांचे राजीनामे देऊन्न मिशनचे आजीव सेवक झाले.

मिशन- यांच्या बायकामुलांनी अस्पृश्य राहतात तेथेच त्यांच्यात मिसळून राहावे या हेतूला अनुसरून मिशनचे ठाणे ग्लोब मिलजवळच्या चाळीत घातले. खालच्या मजल्यात शाळा, दवाखाना, उद्योगालय वगैरेंची व्यवस्था करण्यात आली. वरच्या मजल्यात विठ्ठल रामजींचे

वृध्द आई- वडील, भगिनी जनाबाई, सय्यद अब्दुल कादर यांचे कुटुंब राहू लागले. शिंदे यांचे आई- वडीलही मिशनचे काम समरसून करीत होते.

विठ्ठल रामजींचे कुटुंबीयही अस्पृश्य वर्गात किती समरसून काम करीत होते, याची काही उदाहरणांवरुन कल्पना येते. श्री. मलबारी आणि श्री. दयाराम गिडुमल यांच्या प्रेरणेने व आर्थिक साहयाने मिशनच्या वतीने महिलांच्या उध्दाराचे काम करण्यासाठी निराश्रित सेवासदन स्थापन करण्यात आले होते. विठ्ठल रामजींच्या मातोश्रीने सेवासदनातील गंगू नावाच्या मुलीला रात्रीतून जुलाब होऊ लागले असता आईप्रमाणे तिची स्वच्छता व शुश्रूषा केली. भगिनी जनाबाई इतरांच्या घरी समाचाराला, मदत करायला गेल्या असता खिश्चन समजून त्यांची अवहेलना केली जायची. एका मुरळी म्हणून सोडलेल्या मुलीला अंगभर वाईट रोग झाला असता तिला सदनात तर ठेवता येत नाही हे लक्षात घेऊन, भगिनी जनाबाई यांनी भायखळ्यास एक खोली भाड्याने घेतली व तिला घेऊन त्या तेथे राहिल्या. ह्या आडदांड मुलीने दिलेला त्रास सहन करून त्यांनी तिची शुश्रुषा केली. ती बरी झाल्यावर हैदराबादकडील एका पुरुषाशी विवाह करून ती शिक्षिकेचे काम करू लागली. अण्णासाहेबांचे वडीलही हिशोब लिहिणे वगैरेसारख्या कामात मिशनला साह्य करीत असत. अण्णासाहेबांचे सगळे कुटुंबच या कामात आवडीने गुरफटून गेले. सनातनी वातावरणाच्या ह्या जुन्या काळात अण्णासाहेबांच्या वृध्द मातापित्यांचा हा पुरोगामी दृष्टिकोण व प्रेमळ वृत्ती आदर्शभूत वाटते. थोड्याच अवधीत या सुधारणेचा व्याप त्यांनी पश्चिम व दक्षिण भारतभर वाढविला.

श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या हस्ते आणि अध्यक्षतेखाली मिशनचा पहिला बक्षीस समारंभ १९०९ मध्येच आयोजित केला गेला. म. शिंदे यांची अस्पृश्यतेच्या प्रश्नाची समज जशी या कार्यातून प्रकट होते, तसेच त्यांचे संघटना कौशल्यही दिसून येते. अस्पृश्यवर्गाची उन्नती करणे, त्यांच्या ठायी स्वोध्दाराची तळमळ निर्माण करणे हा उद्देश ते शाळा, उद्योगशाळा व नैतिक शिक्षणाचे संस्कार या द्वारा साध्य करीत होते. स्पृश्यांच्या मनातील अस्पृश्यतेची मानीव कल्पना नाहीशी करून त्यांच्याबद्दल समानतेची भावना निर्माण करणे हा त्यांच्या कार्याचा दुसरा भाग . हे कार्य त्यांनी विविध परिषदा, प्रचारदौरे, तांदूळफंड, रुपीफंड यासारखे फंड इत्यादी सुरू करून केले. फर्ग्युसन कॉलेजच्या अॅफी थिएटरमध्ये भव्य प्रमाणावर मिशनची परिषद त्यांनी १९१२ मध्ये आयोजित केली व विविध कार्यक्रमासह यशस्वीपणे पार पडली. अस्पृश्यता निवारणाच्या कार्याची यशस्विता सर्व थरातील लोकांचे सहकार्य मिळण्यावरच अवलंबून असणार. अण्णासाहेब शिंद्यानी या कार्यासाठी सर्व थरातील लोकांचे सहकार्य व सहानुभूती मिळविली ते पाहून आश्चर्य वाटते. श्रीमंत सयाजीराव गायकवाड, तुकोजीराव होळकर, म्हैसूरचे कांतिरव महाराज यांसारखे संस्थानिक; सर जॉन क्लार्क, सर

म्यूर मॅकेंझी,डॉ.मॅन् यांसारखे इंग्रज अधिकारी;सर चंदावरकर,रँग्लर र.पु.परांजपे,लोकमान्य टिळक यांसारखे मवाळजहाल पुढारी,श्री.शिवराम जानबा कांबळे,श्री.डांगळे,नाथा महाराज, श्री. नांदणे यांसारखे महार, चांभार, भंगी, मांग यांचे पुढारी, या सर्वांचे सहकार्य त्यांनी या कार्यासाठी यशस्वीपणे मिळविले.

पुण्यास १९०९ मध्ये मिशन डे साजरा केला असता विविध धर्माच्या आणि विविध मतप्रणालीच्या पुढा-यांनी या कार्याचा गौरव केला. हंपीच्या शंकराचार्यांचे प्रतिनिधी श्री. हरकारे यांनीही भाषण केले व शंकराचार्यांच्या प्रत्यक्ष सहानुभूतीचे द्योतक म्हणून त्यांच्या आज्ञेनुसार तीनशे रुपयांची देणगी दिली.

स्पृश्यांच्या मनातील अस्पृश्यतेची जाणीव नष्ट करण्याच्या कामी परिषदांचा चांगल्या प्रकारे उपयोग होतो अशी शिंदे यांची कल्पना होती. भारतीय राष्ट्रीय सभेच्या म्हणजे काँग्रेसच्या वार्षिक परिषदांच्या वेळेला शिंदे हे मिशनच्याही परिषदा संघटित रूपाने भरवू लागले. मिशन १९०६ मध्ये स्थापल्यावर १९०७ मध्ये सुरत,१९०८ मध्ये मद्रास,१९०९ लाहोर,१९१० अलाहाबाद,१९१२ बाकीपूर १९१३ कराची येथे काँग्रेसच्या वेळी मिशनच्या या परिषदा त्यांनी भरविल्या. या परिषदांमुळे प्रांताप्रांतातून आलेल्या पुढा-यांचे लक्ष मिशनच्या कार्याकडे वेधले जात असे. त्या त्या प्रांतात मिशनच्या कार्याची उभारणी करण्यासाठी मदत मिळत असे. त्यांनी मिशनच्या कार्याचा व्याप मोठ्या कल्पकतेने,संघटना-कौशल्य दाखवीत व अत्यंत तळमळीने भरपूर वाढविला. मिशन स्थापन झाल्यावर अर्ध्या तपाच्या अवधीत म्हणजे १९१२ साली एकंदर १४ ठिकाणी २३ शाळा,५५ शिक्षक,११०० मुले,५ वसतिगृहे,इतर १२ संस्था व ७ प्रचारक एवढा कामाचा व्याप वाढविला होता. पश्चिम आणि दक्षिण हिंदुस्थानातील सात प्रांतांमध्ये मिशनचे काम वेगाने चालले होते.

मिशनचे जे कार्य चालले होते त्यामध्ये स्पृश्यांच्या मनामध्ये पालट करण्याचा जसा हेतू होता त्याच प्रमाणे अस्पृश्य वर्गातील विद्यार्थ्यांची शैक्षणिक,आत्मिक प्रगती व्हावी व त्याला आर्थिकदृष्टया स्वावलंबी होता यावे असाही अण्णासाहेब शिंदे यांचा उद्देश होता. म्हणून पुस्तकी शिक्षण देण्याच्या जोडीने त्यांनी उद्योगशाळा चालविण्यावरही भर दिला. मुंबईतील परळ शाळेत बुक बाइंडिंग,सुतारकाम व शिवण्याचे काम,मंगळूर येथे हातमागावर विणण्याचे काम, महाबळेश्वर येथे काथ्याचे दोरखंड आणि वेताच्या टोपल्या वगैरे करण्याचे काम या उद्योगशाळांतून शिकवले जात होते. औद्योगिक शिक्षणाची त्यांची कल्पना अशी होती की, विद्यार्थ्यांच्या हातांना आणि डोळ्यांना व्यावहारिक वळण लागावे आणि त्याद्वारा त्याला भावी आयुष्यामध्ये कोणतातरी हस्तकौशल्याचा धंदा करता यावा. अशा धंद्याची तयारी लहानपणापासूनच केली नाही तर ते पुढे पोकळ पंडित बनून आईबापांच्या आणि स्वतःच्या

निराशेला कारणीभूत होतील. शाळेतील सर्व मुलांनी, विशेषतः वसतिगृहातल्या सर्व विद्यार्थ्यांनी, उद्योगशाळांतील कोणत्या ना कोणत्या वर्गातील औद्येगिक शिक्षण दिवसातून दोन तास तरी घ्यावे अशी त्यांची योजना होती.

विठ्ठल रामजी शिंदे यांचे लक्ष अस्पृश्य वर्गातील सर्व जातींची सुधारणा व्हावी इकडे लागलेले होते. सातारा येथील मांग लोक हे १९१२ च्या सुमारास सरकारकडून पिढीजात गुन्हेगार समजले जात असत व त्यांना फार अन्यायाची वागणूक दिली जात असे. त्यांची स्थिती सुधारण्यासाठी विठ्ठल रामजींनी पुढाकार घेतला होता. त्यावेळेच्या गव्हर्नरानी मांग लोकांसाठी शिंदे यांच्या सूचनेनुसार शेतकी खेडे वसविण्यासाठी जागा देण्याचे मान्य केले. शिंदे यांनी सातारा, सांगली, बुधगाव यांच्या सीमेवरील जंगली प्रदेशाची भर उन्हात पायपीट करून पाहणी केली व जागाही निवडली. परंतु लवकरच पहिले महायुध्द सुरू झाले. सरकारने ही जागा सैनिकांच्या आणि त्यांच्या कुटुंबियांसाठी राखून ठेवण्याचे ठरविले. कालांतराने या जागेवरच विलिंग्डन कॉलेज उभारले गेले. गुन्हेगार लोकांच्यासाठी शेतकी खेडे वसविण्याची शिंदे यांची कल्पना त्यावेळेला मूर्त झाली असती तर याबाबतीत एका अभिनव प्रयोगाचे दर्शन घडून गुन्हेगार समजल्या जाणा-या जातींच्या भवितव्यतेला वेगळे वळण मिळाले असते.

अस्पृश्यांची स्थिती सुधारण्यासाठी शिंदे यांनी १९१६ साली हिंदुस्थान सरकारला ज्या काही सूचना केल्या आहेत त्यावरुन त्यांची अस्पृश्यांची सर्वांगीण उन्नती व्हावी अशी भूमिका दिसून येते. अस्पृश्य वर्गातील मुलांसाठी खेडयांत आणि शहरात वाढत्या प्रमाणावर शाळा उघडाव्यात, निदान जिल्हयातून एका तरी शाळेला औद्योगिक शाळेची जोड असावी, त्यांना उदार प्रमाणात वेतने देण्यात यावीत, त्यांनी सहकारी पतपेढया काढाव्यात, यासाठी प्रयत्न करावेत, हया त्यांच्या काही प्रमुख सूचना होत.

अस्पृश्य वर्गाची सार्वत्रिक व वेगाने उन्नती करावयाची तर हा प्रश्न राजकीय पातळीवर नेणे अण्णासाहेबांना आवश्यक वाटले. अस्पृश्यता निवारणाचा ठराव काँग्रेसनेच संमत करावा असा त्यांचा आठदहा वर्षे प्रयत्न चालला होता. त्यांच्या या प्रयत्नाला १९१७ साली यश आले. डॉ. ॲनी बेझंट या मिशनच्या सभासद, हितचिंतक होत्या. मिशनच्या कार्याची त्यांना जवळून माहिती होती. कलकत्ता काँग्रेसच्या १९१७ साली त्या अध्यक्ष झाल्यावर म. शिंदे यांनी ठराव येण्याबाबत निकराचा प्रयत्न केला व बेझंटबाईच्या मुळे काँग्रेसमध्ये हा ठराव संमत झाला. ठरावाचा मसुदा असाः ही राष्ट्रीय सभा हिंदुस्थानातील सर्व लोकांस अशी जाहीर विनंती करते की, अस्पृश्य वर्गावर आजपर्यंत जो अनन्वित जुलूम होत आहे तो ताबडतोब बंद करण्यात यावा. एकदा राष्ट्रीय सभेनेच असा ठराव संमत केल्यानंतर प्रांतिक शाखांनीही या ठरावाला अनुमती दिली व अस्पृश्यता निवारणाच्या कार्याला राष्ट्रीय मान्यता

मिळून वेग आला. म.शिंदे यांनी १९१८ मध्ये मुंबई येथे श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या अध्यक्षतेखाली अखिल भारतीय अस्पृश्यता निवारण परिषद भरविली. या परिषदेला बिपिनचंद्र पाल, जमनादास द्वारकादास, बॅ. जयकर, भुलाभाई देसाई इत्यादी हिंदुस्थानातील बरेच प्रमुख पुढारी उपस्थित होते. म. गांधी, टागोर, करवीर शंकराचार्य यांच्या अभिनंदनपर तारा आल्या होत्या. या परिषदेत संमत झालेल्या अस्पृश्यता निवारणाच्या ठरावातील अटी आपण अक्षरशः पाळू अशा प्रकारच्या प्रतिज्ञा पत्रावर सर्व प्रांताच्या जवळ जवळ ३०० पुढा-यांच्या स्वाक्ष-या मिळविण्यात आल्या. म. शिंदे यांच्या प्रेरणेने झालेले अखिल भारतीय पातळीवरचे हे काम मोठेच म्हणावे लागेल.

म. शिंदे हे मिशनच्या कामाचा पसारा वाढवत असतानाच मिशनशी फारकत घेण्याचा निर्णय त्यांना घ्यावा लागला. त्यांनी १९१२ मध्ये मिशनचे ठाणे मुंबईहून पुण्यास हलविले होते. मिशनच्या कामावर संतुष्ट होऊन श्रीमंत तुकोजीराव होळकरांनी मिशनला २०,००० रु.ची मदत दिली होती. मिशनचे मित्र सर र. पु. परांजपे सरकारात मंत्री असल्याने सरकारकडून ८०,००० रु.ची मदत मिळाली होती. ज्या जागेत म. जोतीबा फुले यांनी पहिल्यांदा अस्पृश्य वर्गातील मुलांसाठी शाळा काढली होती ती व लगतची आठ एकराची भोकरवाडीतील जागा मिशनसाठी घेऊन तेथे अहल्याश्रम ही इमारत बांधण्याचे काम सुरू केले होते. या सुमारालाच मिशनशी संबंधित असणारी काही मंडळी म. शिंदे यांना लक्ष्य करून मिशनवर टीका करू लागले. मिशन इमारतीवर पैसा खर्च करते, औद्योगिक शिक्षणावर खर्च करते असा टीकेचा रोख होता. बांधकाम पूर्ण करून आपल्यावरील आक्षेपांचे निराकरण करून म. शिंदे यांनी सेक्रेटरी या नात्याने मिशनशी असलेला संबंध तोडण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय घेताना आपली भूमिका वृत्तपत्रात जाहीर केली. मिशनचा उद्देश अस्पृश्यांत स्वाभिमान उत्पन्न करून त्यांना स्वावलंबी बनवण्याचा होता व आहे. ही विचारजागृती होत असल्याबद्दल आनंद प्रगट करून हे मिशन याच मंडळीसाठी आहे व त्यांनीच चालवावे हे योग्य, असे त्यांनी म्हटले. त्यांनी मिशनची नवी घटना मंजूर करून घेतली. ही घटना करताना मिशन कोणाही एका जातीच्या ताब्यात जाणार नाही ही दृष्टी ठेवली. नव्या घटनेत पदाधिका-यांत दोन तृतीयांश अस्पृश्य असावेत, व महार, चांभार, मांग, भंगी, मुसलमान या वर्गाचे प्रत्येकी दोन व पारशी, मराठा, ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांचे प्रत्येकी एक असे प्रतिनिधी असावेत अशी व्यवस्था केली. अशा त-हेने आपणच स्थापन करून भरभराटीस आणलेले मिशन त्यांनी सोडले. हे कार्य करण्यासाठी ऐन उमेदीतील दीड तपाचा काळ खर्च केला. ज्यांच्यासाठी अपार कष्ट केले, त्यांनीच केलेली अवहेलना पचविली. मात्र याबद्दलची कटुता त्यांच्या मनात नव्हती. मिशनशी सेक्रेटरी म्हणून असलेला संबंध सुटला तरीही अस्पृश्यतानिवारणाचे आणि त्यांच्या

उन्नतीचे त्यांचे कार्य त्यांनी चालूच ठेवले. कारण हे काम त्यांच्या दृष्टीने धर्मकार्य होते. ब्राह्मधर्मापासून जशी ते सुटका करून घेऊ शकत नव्हते तसेच अस्पृश्यता निवारणाच्या कार्यापासूनही ते स्वत:ची सुटका करून घेऊ शकत नव्हते. कारण धर्मकार्य करणे हा त्यांचा जीवितहेतू होता व त्यांच्या दृष्टीने अस्पृश्यांबद्दलचे कार्य हे धर्मकार्यच होते. म्हणून १९२४ च्या पावसाळयात त्रावणकोर संस्थानातील वायक्कम येथील मंदिर प्रवेशाच्या सत्याग्रहात साधू शिवप्रसाद या अस्पृश्य पुढा-यासमवेत त्यांनी भाग घेतला. अस्पृश्यांच्या कळकळीने ते म. गांधीशी भांडण विकत घेत होते. काँग्रेस आणि म. गांधी अस्पृश्यता निवारणाच्या प्रश्नाकडे पुरेसे लक्ष देत नाही अशी त्यांची तक्रार होती त्यांनी २५ नोव्हेंबर १९२४ ला म. गांधींना पत्र लिहिले. त्यामध्ये ते म्हणतात, "आपल्या ह्रदयात खादीला पहिले स्थान, हिंदू-मुस्लिम ऐक्याला दुसरे आणि अस्पृश्यता निर्मूलनाला कदाचित तिसरे स्थान आहे. पण माझ्या ह्रदयात अस्पृश्यता निर्मूलनाला पहिले स्थान आहे. काँग्रेसच्या आचार विचारात किती तफावत असते, हे आपल्याला माहितच आहे." यापुढे ते म्हणतात, नागपूरच्या सबजेक्ट कमिटीमध्ये आपण आणि राजगोपालाचारी यांच्याशिवाय कोणी आस्था दाखविली नाही, दक्षिणेतल्या सत्याग्रहाची सफाईने उपेक्षा केली. वायक्कम येथे आपल्याला येणे जमले नाही, मालवीयजी येणे शक्य नव्हते. अशा त-हेने अस्पृश्यांची बाजू ते हिरीरीने घेताना दिसतात.

अस्पृश्यता निवारणाच्या कार्याची त्यांची कळकळ किती उत्कट होती हे १९२९ मध्ये श्री. सि. बा. लांडगे यांच्या 'पर्वती सत्याग्रह' या पुस्तकास त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेवरून दिसून येते. ते म्हणतात, "अशा आणीबाणीच्या (सत्याग्रहाच्या) वेळी राष्ट्रीय सभेच्यावतीने काही देशभक्त अस्पृश्यांना पुन्हा वाट पाहात स्वस्थ बसावयास सांगतात व म. गांधीसारखे नेते असमय मौन धारण करतात हे त्याहूनही खडतर दुर्दैव -- नव्हे राष्ट्रीय दौर्बल्य. मी तर म्हणतो, या प्रश्नाचा सोक्षमोक्ष तारीख ३१ डिसेंबर १९२९ च्या मध्यरात्रीपूर्वीच झाला पाहिजे. हा सत्याग्रह होऊ दिला ही म. गांधी आदिकरून आम्हा सर्व स्पृश्यांची चूक झाली. अस्पृश्यता कायम ठेवून हिंदुस्तानने स्वराज्य उपभोगावयास पुढे सरसावणे म्हणजे सर्व जगाला एक धोका आहे".

अस्पृश्यांच्यासाठी स्वतंत्र मतदारसंघ दिले जाण्याची शक्यता १९३२ मध्ये निर्माण झाली. म. गांधींनी उपोषण जाहीर केले होते. तेव्हा म. शिंदे यांनी संयुक्त मतदारसंघाचा तळमळीने व सडेतोड युक्तिवादाने पुरस्कार केला. पुण्याला दाणेआळीत सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात त्यांच्या अध्यक्षतेखाली संयुक्त मतदारसंघाचा पुरस्कार करणारी सभा झाली. अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ देणे म्हणजे त्यांची अस्पृश्यता कायम करण्यासारखे आहे असे त्यांना वाटत होते आणि म. शिंदे यांचा प्रारंभापासून प्रयत्न असा होता की, अस्पृश्य हे

उच्चवर्णीय हिंदूंच्यामध्ये पूर्णपणे सामावून जावेत. त्यांचा निर्देश करण्यासाठी वेगळा शब्द वापरण्याची गरजच भासू नये. आयुष्यभर त्यांचा प्रयत्न या दोन्ही वर्गाच्या जुटीसाठी होता. अण्णासाहेब शिंदे यांच्यावर बालपणीच वारकरी संप्रदायाचे संस्कार झालेले होते. ह्या वारकरी संप्रदायाने आध्यात्मिक समतेचा प्राचीन काळापासून पुरस्कार केला होता. म. शिंदे हे त्याच परंपरेतील होते. त्यांनी लौकिक व्यवहारात सामाजिक समतेचा पुरस्कार केला. सामाजिक समतेचा पुरस्कार करून त्यांनी एक प्रकारे भागवत धर्माचाच विकास साधला असे म्हणावे लागेल.

# ५. आणखी धर्मकार्य

विठ्ठल रामजी शिंदे हे एकनिष्ठ ब्राह्म होते. या ना त्या स्वरुपात त्यांनी आयुष्यभर धर्मकार्य अखंडपणे चालविले. १९१० साली मुंबई प्रार्थना समाजाशी प्रचारक या नात्याने असलेला त्यांचा संबंध संपला त्यांनतर मिशनच्या द्वारा अस्पृश्यता निवारणाचे कार्य ते धर्मकार्य समजूनच करीत होते. १९२३ मध्ये मिशनच्या कामाच्या जबाबदारीतून औपचारिकपणे ते मोकळे झाले. भारताच्या दक्षिण भागात मंगलोर,कालिकत,कोईमतूर वगैरे शहरी व त्रावणकोर मध्ये काही लहान मोठ्या ब्राह्म समाजाचे काम चालू होते. पण तेथे कलकत्त्याच्या साधारण ब्राह्म समाजाचा प्रतिनिधी म्हणून कोणी प्रचारक राहात नव्हता. हया प्रांती ब्राह्म समाजाचे काम अव्यवस्थित व विस्कळीतपणे चालले होते. तेथे एखाद्या अनुभवी आणि वाहून घेतलेल्या प्रचारकाची गरज होती. ह्या सुमारास विठ्ठल रामजी शिंदे हे ब्राह्म समाजाचे काम करण्यास मोकळे असल्याने या भागात प्रतिनिधी म्हणून कलकत्त्याच्या ब्राह्म समाजाने त्यांची निवड केली. मंगलोर येथे मंगलोर ब्राह्म समाज हे त्यांच्या आचार्यपदाचे मुख्य ठाणे ठरविण्यात आले. त्यांना कानडी उत्तम येत होते. श्री.के.रंगराव यांनी स्थापन केलेली डिप्रेस्ड क्लासेस मिशनची शाखाही तेथे होती. १९०७ साली शिंदे मंगलोरला गेले असता तेथील समाजबंधूंचा त्यांच्यावर लोभ जडला होता. मंगलोर ब्राह्म समाजाने विठ्ठल रामजींचे आचार्य म्हणून आनंदाने स्वागत केले.

शिंदे मंगलोरास गेल्यानंतर सर्व पंथात व धर्मामध्ये काम करू लागले. उदार धर्मप्रसाराचे काम ते उपासना,व्याख्याने यांच्या द्वारा करीत. तसेच हिंदू पध्दतीच्या कीर्तनाच्या द्वाराही करीत. तेथे ख्रिश्चनांची बहुसंख्या होती. त्यांच्यामध्ये जाऊनही ते एखाद्या रोमन कॅथॉलिक संताचे आख्यान लावीत. त्यांची प्रवचने ऐकण्यासाठी काही नवी- जुनी कॅथॉलिक मंडळीही ब्राह्म मंदिरात येत असत.

१९२४ च्या पावसाळ्यात त्रावणकोर संस्थानातील वायक्कम या गावी मंदिरप्रवेशासाठी सत्याग्रह सुरू झाला. वायक्कम येथील देवळात परधर्मियांना जाण्यास मनाई नव्हती., परंतु,

अस्पृश्य मानलेल्यांना मात्र मंदिरप्रवेश करण्यास कायदेशीर मनाई होती. येथे मंदिरप्रवेशासाठी सत्याग्रह करण्याचे शिंदे यांनी ठरविले. साधू शिवप्रसाद या पूर्वाश्रमी अस्पृश्य असलेल्या ब्राह्म तरुणासमवेत मंदिरप्रवेश करण्याचा प्रयत्न होता. पोलिसांनी साधू शिवप्रसाद यांना प्रवेश नाकारला. त्यांनी आपण हिंदू नाही असे जाहीर केल्यास परवानगी देण्यात येईल असेही सांगितले. शिंदे यांनी या प्रकरणात संस्थानाच्या दिवाणाशी हुज्जत घातली परंतु त्याचा उपयोग झाला नाही. ब्राह्म समाजाचे आचार्य म्हणून काम करीत असतानाही शिंदे यांचे अस्पृश्यतानिवारणाचे कार्य चालले होते.

मंगलोर प्रार्थना समाजाला राजकारणाचे मात्र वावडे होते. ब्राह्म समाजात असलेली बिल्लव जातीची मंडळी पूर्वाश्रमी अस्पृश्य गणली जात होती. ब्राह्म समाजात एक- दोन पिढ्या गेल्यानंतर या मंडळीना चांगल्या सरकारी नोक-या व युरोपियन कंपनीत अधिकाराच्या जागा मिळाल्या होत्या. डोक्यावर गांधी टोपी घालणा-या अण्णासाहेब शिंद्यांच्या राजकीय मताबद्दल या मंडळींच्या मनात संशय निर्माण झाला.

विठ्ठल रामजी शिंदे हे राजकारणात भाग घेतात असा मंगलोर येथील बिल्लव ब्राह्मांचा समज झाला होतात. त्यांनी गांधी टोपी वापरू नये. खादी घालू नये अशा प्रकारच्या अटी समाजाचे सभासद असलेली बिल्लव मंडळी त्यांच्यावर घालू पहात होती. दहा समाजीयांनी त्यांच्याबद्दल कलकत्ता ब्राह्म समाजाकडे तक्रारही केली. अण्णासाहेब शिंदे यांना असल्या अटी लादणे पसंत नव्हते. आपल्या राजकीय मतांना मुरड घालण्यास ते तयार नव्हते. पुण्याच्या अहल्याश्रमाच्या नवीन इमारतीचे उद्‌घाटन एवढयात ठरले होते. मिशनच्या पुणे शाखेकडून त्यांना आग्रहाचे निमंत्रण आले होते. तेव्हा मंगलोर येथील आचार्यपदाचे काम सोडण्याचे ठरवून अण्णासाहेब शिंदे यांनी कलकत्ता ब्राह्म समाजाची तशी परवानगी घेतली व एप्रिल १९२५ मध्ये पुण्यास कायमचे राहण्यासाठी ते परत आले.

पुण्यास आल्यानंतर त्यांनी पुढील धार्मिक कार्याची योजना आखली. १८९८ मध्ये ते फर्ग्युसन कॉलेजमध्ये विद्यार्थी असताना त्यांनी असा विचार प्रकट केला होता की, प्रार्थना समाजासारख्या उदार धर्माचा प्रसार बहुजन समाजात, खेडवळ लोकांत होणे जास्त गरजेचे आहे. मंगलोरहून पुण्यात आल्यावर ब्राहम धर्माचा प्रसार साधारणपणे बहुजन समाजात आणि विशेषत: कुटुंबात कसा होईल याबद्दल ते कळकळीने विचार करू लागले व त्या दृष्टीने त्यांनी कौटुंबिक उपासना मंडळाची योजना तयार केली. या कामी त्यांच्या भगिनी जनाबाई यांचे सहकार्य त्यांना मिळाले. श्री. बाबूराव जगताप, गणपतराव शिंदे, रामराव ज्योतीराव शिंदे, जेधे, काळभोर वगैरे प्रागतिक विचाराची मंडळी या कौटुंबिक उपासना मंडळास अनुकूल होती. या मंडळीपैकी एकेकाच्या घरी अण्णासाहेब आणि त्यांच्या भगिनी जनाबाई रविवारच्या

दिवशी जाऊन ब्राह्मधर्माच्या कौटुंबिक उपासना चालवू लागले. हा उपक्रम वर्षभर चालविल्यानंतर कौटुंबिक.पासना मंडळाची घटना त्यांनी तयार केली.

कौटुंबिक उपासना मंडळाचे पत्रक काढण्यात आले ते असे.

## कौटुंबिक उपासना मंडळ

### विनंतीपत्र

यं हि किच्चं अपविध्दं अकिच्चं पन कयिरती ।

उन्नलानां ममत्तानां तेसं वडढानि आसवा ॥

धम्मपद अ.२१.,श्लोक.३

**अर्थ** -- जे करावयास पाहिजे त्याचा चुथडा होत आहे.जे करू नये ते पण केले जात आहे. उनाड आणि प्रमत्त जे,त्यांच्या वासना वाढत आहेत.

१.हल्ली लोकसमाजाची स्थिती अत्यंत कीव येण्यासारखी झाली आहे. अध्यात्म म्हणजे काय हे लोकांना कळून त्याची थट्टा उघड उघड चालली आहे. तरुण नास्तिक व वृद्ध निराश झालेले दिसतात. मनुष्याचा मनुष्यावर विश्वास नाही. कारण एकच की धर्माचा पाया ढासळू लागला आहे.

२. धर्माविषयी विचार अथवा उपासना करावयाची झाल्यास फार तर प्रौढ मंडळीच जमतात. तेही क्वचित्. अशा एकांगी विचारांचा आणि उपासनांचा परिणाम कुटुंबावर होत नाही, ह्यात नवल नाही. खरी धार्मिक उपासना सहकुटुंबच व्हावयास पाहिजे. म्हणून खऱ्या श्रध्देने व प्रेमाने प्रेरित झालेली मंडळी नियमितपणे उपासनेसाठी एकत्र होणे आवश्यक आहे.

३. धर्म म्हणजे केवळ मत नव्हे. तत्त्वज्ञान किंवा बाह्य कर्मेही नव्हेत . धर्म ही बाब अंतःकरणाची व भावनांची आहे, म्हणून धर्माचा उदय आणि प्रसार कुटुंबाचे द्वारा होणेच उचीत आहे. तसे इतिहास सांगत आहे. कुटुंब म्हणजे केवळ बायकोच नव्हे. आईबाप, बहिणभाऊ,नवराबायको,मुले ह्यांच्या प्रेमाचे केंद्र म्हणजे कुटुंब. हेच धर्माचरणाचे व प्रसाराचे क्षेत्र. केवळ व्यक्ती नव्हे.

४. वरील गोष्टी ध्यानात आणून अशा स्वतंत्र शुद्ध कार्यकारी उपासनेची एक घटना करण्याची मंडळाची इच्छा आहे. ज्यांना हा उद्देश पटतो त्यांनी ह्या घटनेत सहकुटुंब यावे,असे आमंत्रण आहे.ज्यांना कुटुंबच नसेल त्याने एकटे आल्यास चालेल,पण तो अथवा ती सभासद होऊ शकणार नाही. कोणाची खाजगी मते अथवा कौटुंबिक परंपरा कशा आहेत हे पाहण्याची

व ती कशी असावीत हे ठरवण्याची मंडळाची इच्छा नाही व अधिकारही नाही.प्रत्येकाचे अंतर जाणणारा ईश्वर समर्थ आहे. एकमेकांच्या अंतरात डोकावण्यापेक्षा व वर्तनाविषयी साशंक राहण्यापेक्षा सर्वांनी एकत्र जमून चित्तशुध्दी करणे म्हणजे उपासना होय.

५. कुटुंबे कोणत्याही दर्जाची, जातीची, राष्ट्रांची अगर धर्माची असोत, अथवा ह्यांपैकी कोणतीही उपाधी नसलेली असोत, तिकडे पाहण्याचा मंडळाचा अधिकार नाही. मंडळात येणाऱ्यांना उपासनेसंबंधी खरी श्रध्दा आणि कळकळ पाहिजे आणि ती नियमितपणा, वक्तशीरपणा, स्थिरपणा आणि शांतपणा ह्या गुणांच्या द्वाराच दिसून आली पाहिजे एवढीच मंडळाची शर्थ आहे.

६. मंडळाचा सर्व विचार आणि व्यवहार केवळ बहुमताने ऐहिक कार्याप्रमाणे चालणार नाही. योग्यायोग्यतेनुरूप निकाल व अंमलबजावणी होईल.

खरी धार्मिक उपासना सहकुटुंबच व्हावयास पाहिजे,धर्माचा उदय आणि प्रसार कुटुंबाच्या द्वाराच होणे उचित आहे, कुटुंब म्हणजे केवळ बायकोच नव्हे, आईबाप, बहिणभाऊ, नवराबायको यांच्या प्रेमाचे केंद्र म्हणजे कुटुंब ही भूमिका विशद करून या उपासना मंडळात सहकुटुंब येण्याचे आवाहन करण्यात आले. प्रारंभी या कौटुंबिक उपासना मंडळाचे सेक्रेटरी म्हणून श्री. कृष्णराव गोविंद पाताडे यांनी काम केले. त्यानंतर श्री. बाबूराव जगताप हे काम करीत होते. दहा- बारा कुटुंबे या मंडळाची सभासद झाली. सहा महिन्याच्या अवधीत तीस उपासना व पाच कीर्तने झाली. अनेक कुटुंबांतील स्त्रिया लेकीसुनांसह हजर असत. १९२६ च्या डिसेंबर अखेरीस एक दिवस ह्या मंडळींनी शहराबाहेर निसर्गाच्या सान्निध्यात आध्यात्मिक उत्सवात घालविला.

१७ जुलै १९२७ रोजी मंडळाचा वार्षिक उत्सव श्री. शिवाजी हायस्कुलात सर्व कुटुंबाना एकत्र जमवून साजरा करण्यात आला. कौटुंबिक उपासना मंडळाच्या या उत्सवासाठी बाहेरगावाहून श्री. गोविंदराव सासने, सौ. आनंदीबाई शिर्के यांसारखी मंडळी आली होती. अस्पृश्य कुटुंबांसह सर्व मंडळींनी भेदभाव न बाळगता सहभोजनात भाग घेतला.

श्री गौतम बुध्द जयंती, खिस्त जयंती हे दिवस कौटुंबिक उपासना मंडळ गावाबाहेर वनोपासना करून साजरे करीत असते. यानिमित्ताने प्रो. धर्मानंद कोसंबी, डॉ. ग. य. चिटणीस व महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या व्याख्यानांचा अथवा प्रवचनांचा लाभ मंडळाला होत असे. १९३० साली महर्षी शिंदे तुरुंगात गेल्यामुळे कौटुंबिक उपासना मंडळाच्या कामात काहीसा खंड पडला होता, परंतु त्यानंतर मांडुर्यास प्रिन्सिपॉल वि. के. जोग यांच्या घरी व त्यानंतर अण्णासाहेब शिंदे यांच्या "रामविहार" बंगल्यामध्ये कौटुंबिक उपासना मंडळाचे काम चालू

राहिले. उदार धर्ममताचा कुटुंबामध्ये प्रसार करण्याचे व कुटुंबाकुटुंबामध्ये जिव्हाळा व स्नेहभाव वाढीस लावण्याचे काम अण्णासाहेब शिंदे यांच्या प्रेरणेने कौटुंबिक उपासना मंडळाने चांगल्या प्रकारे पार पाडले.

वाई येथील ब्राह्म समाज महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या प्रेरणेने स्थापन झाला. प्रथम वाईस ४ जुलै १९३३ रोजी प्रार्थना संघ स्थापन करण्यात आला. सन १९३३ साली राममोहन राय शतसंवत्सरीच्या निमित्ताने महर्षी शिंदे तेथे गेले असता प्रार्थना संघाची पहिली घटना झाली तेव्हाच या संघाला ब्राह्म समाज हे नाव द्यावे असा आग्रह तेथील मंडळींचा पडला होता. अण्णासाहेब शिंदे यांनी पाचतरी अनुष्ठानिक गृहस्थ तयार होण्याची अट घातली. त्यांच्या इच्छेप्रमाणे पूर्तता झाली. या प्रार्थना संघाने कामामध्ये सातत्य दाखविले व त्यानंतर रीतसर ब्राह्म समाजाची घटना करण्यात आली. वाई येथे ब्राह्म मंदिर बांधून झाल्यावर २५ मे १९३७ रोजी मंदिरप्रवेशाचा समारंभ महर्षी शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली झाला. मंदिरप्रवेश करण्याच्या आधी दोन तासापूर्वी एका ढोर गृहस्थाच्या घरी कौटुंबिक उपासना करण्यात आली व त्या सबंध घराण्याने ब्राह्म धर्माची दीक्षा घेतली.

वाई ब्राह्म समाजाचे काम केवळ शहरापुरते राहू नये असा महर्षी शिंदे यांचा आग्रह होता. संबंध तालुक्यातील खेड्यातून ब्राह्म धर्माचा संदेश पोहोचवावा ही त्यांची अपेक्षा होती व त्याप्रमाणे वाई ब्राह्म समाजाने कार्य केले. भुईंज, पाचवड इ. खेडयांमध्ये स्वतः महर्षी शिंदे यांनी कार्यकर्त्यांसमवेत दौरे काढले. महारवाड्यांतून, मांगवाडयांतून ते फे-या काढत असत. एकाचवेळी धर्मप्रसाराचे कार्य व अस्पृश्यता निवारणाचे कार्य यांचा त्यांनी एकमेळ करून टाकला होता. खेडयामध्ये फिरण्याचा त्यांचा आग्रह असे. १६ ऑक्टोबर १९३६ रोजी वाई प्रार्थना समाजाला लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, "आपण व्यवस्था करत असाल तर मी व केसकर चार दिवस आधी येऊन खेडयांत फिरू. नाहीतर दोन- तीन दिवस नुसते लाडू खाण्यास व प्रार्थना करण्यास मला येणे होत नाही."

काही उपासना स्त्रियांनी चालवाव्यात असाही त्यांचा आग्रह असे. एका पत्रामध्ये ते म्हणतात, "कोणी भगिनी स्त्रियांकरिता उपासना चालविण्यास मिळाली नाहीतर मी चालवीन. त्यावेळी मी लुगडे नेशीन म्हणजे वाद मिटला."

महर्षी शिंदे यांच्या प्रेरणेने व आस्थेमुळे वाई ब्राह्म समाजाचे काम उत्तम त-हेने चालले होते. खेडयापाडयातील लोकांत उदार धर्मप्रसार करण्याचे त्यांचे उद्दिष्ट वाई ब्राह्म समाजामुळे अंशतः तरी सफल झाले. धकाधकीच्या कार्यकाळानंतर त्यांच्या आयुष्याच्या उत्तरकाळात वाई ब्राह्म समाज हे त्यांच्या मनोविश्रांतीचे ठिकाण बनले.

# ६. राजकारण

महर्षी शिंदे यांनी आपल्या आयुष्यात केलेल्या अनेकविध कार्याचा राजकारण हा एक पैलू होय. त्यांचा पिंड आध्यात्मिक स्वरुपाचा असल्यामुळे केवळ ऐहिक दृष्टिकोणातून राजकारण करणे त्यांच्या स्वभावात बसण्याजोगे नव्हते. स्वतंत्रतेची आवड, अन्यायाची चीड, दीनदुबळयांचा उध्दार करण्याची तळमळ व अभेदाचा दृष्टिकोण या बाबी त्यांच्या व्यक्तिमत्त्वात मुरलेल्या होत्या. म्हणून ज्या वेळेला नैतिक आणि आध्यात्मिक दृष्टीने राजकारणात भाग घेणे त्यांना आवश्यक वाटले, त्या त्या वेळी त्यांनी मोकळेपणाने राजकारणात भाग घेतला, असे दिसून येते. उच्चतर दृष्टिकोणातून त्यांनी केलेले जे राजकारणविषयक कार्य आहे त्यातून त्यांचा स्वतंत्र बाणा आणि अभेदाची दृष्टी प्रकट होते.

मुंबई प्रार्थना समाजाच्या धुरीणांचा राजकीय दृष्टिकोण प्रागतिक अथवा मवाळ होता. हया मवाळातही मतभिन्नता असावयाची. डॉ. भांडारकर व ना.गोखले हे दोघेही प्रागतिक पक्षाचे पुढारी होते. परंतु डॉ. भांडारकरांचा आग्रह आपले सर्व प्रयत्न धर्माच्या पायावर करण्याचा होता,तर गोखल्यांना धर्माबाबत पूर्ण औदासीन्य होते. त्यांना राजकारणाचा मोह पडत असे. विठ्ठल रामजी शिंदे प्रार्थना समाजाचे प्रचारक असूनही राजकारणाबद्दल आस्था बाळगणारे होते. डॉ. भांडारकर त्यांना कधी कधी प्रेमाने आणि विनोदाने टोमणा मारीत की,"अरे तू काही झाले तरी गोखल्यांचाच शिष्य." त्यावर शिंदेही विनोदाने उत्तर देत "दादासाहेब, नामदार गोखले आपले शिष्य,मग मी आपला नातशिष्य ठरत नाही काय ?" भांडारकर- गोखले या प्रागतिकातच अशा प्रकारची तेढ होती. तर न्या. चंदावरकर व लोकमान्य टिळक या मवाळ-जहाल पुढा-यांमध्ये विरोध असणे अत्यंत स्वाभाविक होते. विठ्ठल रामजी शिंद्यांना तर सर्वांशी सलोखा ठेवून प्रार्थना समाजाचे तसेच अस्पृश्यता निवारणाचे काम करावयाचे होते. मात्र त्यासाठी स्वतःची अंतःप्रेरणा बाजूला ठेवून विठ्ठल रामजी शिंदे यांनी आत्मवंचना करणारे तत्त्वशून्य वर्तन कधीही केले नाही. त्यांची राजकारणविषयक मते जहाल होती. ती त्यांनी कधीही लपवून ठेवली नाहीत. १९०७ साली लोकमान्य टिळकांना ब्रिटिश सरकारने शिक्षा

ठोठावून मंडालेला रवानगी केली. त्यावेळी शिंदे यांनी उपासना चालवून लोकमान्य टिळकांसारखा जनतेचा पुढारी तुरुंगात गेला आहे,त्याच्या शरीराला स्वास्थ्य व मनाला शांती लाभो, अशी प्रार्थना केली.

१९१६ साली भारताच्या राजकारणात बरीच धामधूम चालली होती. लखनौच्या अधिवेशनात हिंदू मुसलमानांना एकत्र आणण्यांच्या दृष्टीने लखनौ करार करण्यात आला. लोकमान्य टिळकांनी हिंदू- मुसलमानांच्या या एकीमध्ये पुढाकार घेतला होता. महायुध्दाच्या दाबामुळे हिंदी लोकांना ब्रिटिश सरकारकडून काही हक्क मिळण्याची शक्यता निर्माण झाली होती. राष्ट्रीय पातळीवर ऐक्याचे हे प्रयत्न चालले असताना महाराष्ट्रात मात्र मागासलेले पुढारलेले, ब्राह्मण- ब्राह्मणेतर, स्पृश्य- अस्पृश्य असे भेद वाढण्याचीच लक्षणे दिसत होती. विशेषतः ब्राह्मण नसलेल्या सर्व जातींना एकत्र आणण्यासाठी ब्राह्मणेतर पक्ष निर्माण होऊ लागला होता. विठ्ठल रामजींना हे वातावरण श्रेयस्कर वाटले नाही. त्यांनी अमरावती येथील सभेत जाहीरपणे सांगितले की, "नवीन होऊ घातलेला ब्राह्मणेतर वाद ऐक्याला फार घातक होईल." या फुटीच्या वातावरणात मराठा समाज,बहुजन समाज हा राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या विरुध्द आहे असाही बोभाटा करण्यात येत होता. श्री.केशवराव जेधे यांच्यासारखा तडफदार मराठा नेता सत्यशोधकी विचारातून ब्राह्मणविरोधी भूमिका घेत होता. ही सगळी परिस्थिती ध्यानात घेऊन विठ्ठल रामजी शिंद्यांना वाटले की, महाराष्ट्रात मराठा समाज हा बहुसंख्य असून महाराष्ट्राच्या पाठीचा कणा असल्यासारखा आश्रयभूत आहे. तेव्हा ह्या समाजाची जागृती तर व्हावी पण ह्या जागृतीमुळे फूट मात्र पडू नये. उलट ब्राह्मणापासून तो अस्पृश्यापर्यंत हे जागृतीचे व ऐक्याचे लोण खाली उतरावे या हेतूने त्यांच्या प्रेरणेतून "मराठा राष्ट्रीय संघ" या नावाची संस्था स्थापन करण्यात आली. या संघाची सभा २६ ऑक्टोबर १९१७ रोजी श्री. गोविंद कृष्णाजी बोत्रे यांच्या घरी भरली. शिंदे यांनी या सभेला मार्गदर्शन केले व सर्वानुमते हया संघाचे राष्ट्रीय सभेला अनुकूल असे धोरण ठरून राष्ट्रीय सभा व मुस्लिम लीग ह्यांनी लखनौच्या बैठकीत स्वराज्याची जी एकत्र योजना ठरवली तिला पाठिंबा देण्यासाठी पुणे शहरात व भोवतालच्या भागात राहणा-या सर्व पंथाच्या,जातीच्या व धर्माच्या लोकांची सभा बोलवावी असे ठरले. ८ नोव्हेंबर १९१७ रोजी शनिवारवाड्यापुढील पटांगणात दहा हजाराच्या समुदायाची सभा भरली. या सभेचे अध्यक्षस्थान शिंदे यांच्याकडे आले. या सभेत अण्णासाहेब शिंदे यांनी ब्राह्मण- अब्राह्मण असा भेद करणे गैर असल्याचे सांगून मराठा समाज स्वराज्याला विरोधी नाही व असणे शक्यही नाही असे निक्षून सांगितले. या सभेत लोकमान्य टिळकांनी भाषण करून जातिभेदाचा राजकारणात शिरकाव होऊ नये,असे सांगितले व राष्ट्रीय सभेची मागणी एका जातीपुरती नसून तिच्यात सर्व जातींच्या हितसंबंधाचे संरक्षण होईल अशी

ग्वाही दिली.

महाराष्ट्राच्या राजकारणात भेदतत्त्वाचा अवलंब केल्याने मागासलेले- सुधारलेले,ब्राह्मण-ब्राह्मणेतर,मराठा- मराठेतर असा भेद पडून हानी होण्याचा जो धोका निर्माण झाला होता तो अण्णासाहेब शिंदे यांनी पुढाकार घेऊन मराठा समाजाला मार्गदर्शन केल्यामुळे टळला. मराठा समाज व पर्यायाने बहुजन समाज राष्ट्रीय सभेच्या कार्यामध्ये पुढे समरस झाला, याची एक प्रकारे पूर्वतयारीच विठ्ठल रामजींच्या या कार्यामुळे झाली होती असे आपण म्हणू शकतो.

१९२० सालच्या निवडणुकीमध्ये विठ्ठल रामजी शिंदे यांनी भाग घेतला. मात्र हा भाग घेतानाही त्यांनी स्वतःचा स्वतंत्र दृष्टिकोण दाखविला. मॉंटेग्यूचेम्सफर्ड सुधारणानंतर १९२० च्या नोव्हेंबरात निवडणूक होणार होती. मराठ्यांमधील दोन्ही पक्षांची संयुक्त सभा पुण्यास जेधे मॅन्शनमध्ये झाली. आगामी निवडणुकीत अण्णासाहेब शिंदे यांनी उभे राहावे असे दोन्ही पक्षांचे मत पडले. मराठ्यांसाठी सात राखीव जागा सरकारने ठेवल्या होत्या. शिंदे यांनी दोन्ही गटांना निक्षून सांगितले की, "त्या राखीव जागेसाठी मी उभा राहणार नाही. त्यातील जातीयवाचक तत्त्वाच्या मी विरुध्द आहे." पुणे शहराच्या उघड्या सर्वसाधारण जागेसाठी निवडणूक लढवण्याचे त्यांनी मान्य केले. स्वतःची भूमिका विशद करण्यासाठी बहुजन पक्ष या नावाने त्यांनी आपला जाहीरनामा प्रसिध्द केला. तो असाः हिंदुस्थानांतील एकंदर लोकसंख्येचे केवळ राजकीय दृष्ट्या दोन मुख्य भाग पडत आहेत. ते हे की (१) विद्याबल, किंवा अधिकारबलाने पुढारलेला वर्ग,(२) आणि दुसरा यांतील कोणतेच बल अंगी नसल्याने व नाइलाजाने मागासलेला वर्ग किंवा बहुजनसमाज. ह्या दुस-या वर्गातच अत्यंत तिरस्कृत अशा अस्पृश्यवर्गाचा अंतर्भाव होतो. हल्लीच्या राजकीय सुधारणेचा नुसता अरुणोदय होतो न होतो तोच ह्या दोन भागांत मोठा विरोध भासू लागला आणि या विरोधानुसार बहुजनसमाजाचा अथवा मागासलेल्या वर्गाचा एक नवीन पक्षच होऊन चुकला आहे. ह्यालाच ब्राह्मणेतरपक्ष असे नाव दिले जाते. पण नाइलाज आणि बलहीनता ही जी मागासलेल्या वर्गाची मुख्य लक्षणे ती ह्या वर्गाच्या पक्षास "ब्राह्मणेतरपक्ष" असे जातिविशिष्ट नाव दिल्याने अगदी काटेकोररीतीने सार्थ होत नाहीत. म्हणूनच ह्या नवीन पक्षास बहुजनपक्ष अथवा जनपदपक्ष असे अगदी सार्थ व निर्विकल्प नाव दिल्याने त्यावर कसलाही आक्षेप आणण्यास जागा उरणार नाही.

**कार्यपद्धती : हा नवीन पक्ष जरी इतरांशी स्वतंत्रपणाने वागणारा आहे तरी जेथे जेथे त्याचा हितसंबंधाचा प्रश्न अभा राहील, तेथे तेथे त्याचा समानतेचा दर्जा संभाळून जी कोणी व्यक्ती असो अथवा पक्ष असो त्याला सक्रीय साहाय्य करण्यास तयार असेल त्याच्यासाठी तेवढ्यापुरते सहकार्य करावयाला हा पक्षही तयार राहील. कारण ह्या पक्षाच्या पायाखाली**

केवळ पोकळ भावना नसून भरीव हितसंबंध आहेत. ह्या पक्षात खालील वर्ग मोडतात.

१ ला, शेतकरी वर्गः ह्यात डोईजड जमीनदारांचा किंवा पिढीजात जहागीरदारांचा समावेश मुळीच होत नही. जो आपल्या मालकीचे अथवा कौलाचे शेत आपणच वाहतो आणि त्या कामासाठी पुरेशा मजूरदारांना समान दर्जाचे योग्य वेतन देऊन संभाळतो तोच शेतकरी जाणावा.

२ रा, शिपाईवर्गः ह्यांत सरदारांची गणना मुळीच नाही. पण सामान्य शिपायाचे हितसंबंध आमच्या पक्षानेच राखले पाहिजेत. कारण ते मागासलेलेच आहेत. कुणबी हा ह्या सर्वांचा खरा पोशिंदा आणि मोठमोठे ऐतखाऊ जमीनदार व जहागिरदार हे केवळ त्याचे पोष्य होत. तसेच हातावर शिर घेऊन लढणारा एकांडा शिलेदार हाच खरा क्षत्रिय, तो केवळ पट्टेवाला चपराशी नव्हे.

३ रा, शिक्षकवर्गः ह्यांत सोवळे शास्त्री, हक्कदार पुरोहित किंवा बलुते जोशी हे किंवा इतर ऐतखाऊ यांची गणना करता येत नाही. वाङ्मयाचे किंवा उद्यमाचे व्यावहारिक शिक्षण देण्याला जे कोणी लायक आहेत व जे आपल्या वृत्तीचा पिढीजात हक्क न सांगता बाजारभावाप्रमाणे चालू वेतन घेण्यास तयार आहेत त्यांची जात, धर्म कांही असो, त्यांचे हितसंबंध ह्या पक्षाने राखणे जरुर आहे.

४ था, उदमीः सुतार, सोनार, शिंपी, तेली, तांबोळी, गवळी इत्यादि लहान लहान धंदे करुन राष्ट्राची सेवा करणारे जे अशिक्षित व अनधिकारी वर्ग आहेत तेही राष्ट्राचे धारक असून त्यांचा दर्जा शेतकरी किंवा शिपाई यांपेक्षा रतिभरही कमी नाही.

५ वा, दुकानदारः ह्यात व्याज देऊन दुस-याचे भांडवल वळवून आणून त्यावर गबर होणारे पेढीवाले किंवा कंपनीवाले वर्ज्य आहेत. परंतु उदमी लोकांच्या व मजुरांच्या साहाय्याने जी राष्ट्रीय संपत्ती शेतक-याने निर्माण केली व शिपायांनी राखली तिची देशभर वाटणी होण्याला बिनव्याजी भांडवलवाल्या दुकानदारांची तितकीच जरुरी आहे. हा वर्ग डोईजड होऊन बहुजनसमाजाचे रक्त बिनहक्क शोषणार नसेल तर ह्यालाही पुढे अणण्यासाठी आमच्या पक्षाने झटणे अवश्य आहे.

६ वा, मजूरवर्गः ह्यांत बाजारभावाप्रमाणे वेतन घेऊन अंगमेहनत करणारेच नव्हेत तर बुध्दिचातुर्य लढवणारे वकील, डॉक्टर यांचाही समावेश होण्याचा संभव आहे. परंतु हा दुसरा वर्ग आपल्या गरजेपेक्षा जास्ती धनसंचय करून अधिकारपदावरही सहजच जाऊन बसतो. इतकेच नव्हे तर आपल्या विद्येच्या व चळवळी स्वभावाच्या जोरावर बहुजनसमाजाचे पुढारीपणही बहुतेक हिस्से त्याच्याच वाट्याला येते. असे लोक तत्त्वतः मजूर असले तरी

वस्तुत: मागासलेले नसल्यामुळे त्यांच्या हितसंबंधांची जबाबदारी त्यांच्यावरच टाकणे बरे. बाकी उरलेल्या ख-या अंगमेहनती मजुरांची दाद आमच्या पक्षाशिवाय इतर कोठेच लागणे शक्य नाही. मजूरही डीईजड झाल्यास त्यांची समजूत करण्याचा अधिकार बहुजनपक्षालाच आहे.

७ वा, अस्पृश्यवर्ग : अस्पृश्यपणामुळे हा वर्ग मागासलेलाच आहे. एवढेच नव्हे तर चिरडला गेला आहे. धर्माची, परंपरेची, रूढीची अगर दुसरी कोणतीही खरी- खोटी कारणे सांगत न बसता अस्पृश्यता व असहाय्यता नष्ट करून त्यांना अगदी समान दर्जाने बहुजनसमाजात एकजीव करणे हे ह्या पक्षाचे केवळ पवित्र कार्य आहे. पुष्कळशी संधी वायफळ वादात, ढोंगी ठरावात व मतलबी सहानुभूतीत अगोदरच दवडली गेली असल्यामुळे ह्या वर्गातील व्यक्तींना साहजिकच भलतेच वळण लागू लागले. म्हणून आमच्या पक्षाने सावध राहिले पाहिजे.

८ वा, स्त्रीवर्ग : चालू राज्यक्रांतीत आमच्या देशातील स्त्रीवर्गाच्या हाती काहीच लाभले नाही. आमचा पक्ष विद्वानांचा नाही, वक्त्यांचा नाही, ओरडणारांचा नाही. म्हणून तो स्त्रीवर्गाला विसरणारा आहे असे थोडेच होणार आहे ? स्त्रीवर्ग म्हणजे तर आमचा पाळणा. त्यांची हयगय करू तर पाळण्यातच आमचे थडगे डोलू लागेल हे आम्ही पूर्ण जाणून आहोत.

येथवर आम्ही केवळ वर्गवारीने हितसंबंधाचे निरीक्षण केले. पण ज्यांची वर्गवारी मुळीच करता येत नाही असे पुष्कळ हितसंबंध आहेत. सक्तीच्या शिक्षणाचा, मद्यपाननिषेधाचा, धार्मिक विधी व सामाजिक परंपरा पाळण्याचे बाबतीत स्वयंनिर्णयाचा इत्यादि कोणताही पक्ष घ्या. हे सर्व राष्ट्रीय असूनही स्वतःस 'राष्ट्रीय' म्हणवून घेणाराच पक्ष जेव्हा त्यांच्या आड येतो आणि 'प्रागतिक' म्हणवून घेणारा आपले हात टेकतो तेव्हा बहुजनसमाजास जागे करून त्याला स्वतःच्या पायावर उभे करण्याचे कठीण काम करण्यासाठी आमच्यासारख्या एखाद्या स्वतंत्र व नवीन पक्षाला पुढे येणे जरूर आहे. राष्ट्रहिताची ज्याला जाण असेल त्याच्या हिताला आमचाही विरोध नसेल. ते सर्व आम्हाला सामील होतील, निदान साहाय्य तरी करतील अशी आम्हाला उमेद आहे."

ज्या बहुजन समाजाची अथवा मागासलेल्या वर्गाची उन्नती करणे हा शिंद्यांचा प्रमुख उद्देश होता, त्या वर्गात त्यांनी शेतकरी वर्ग, शिपाईवर्ग, शिक्षकवर्ग, उद्यमीवर्ग, दुकानदारवर्ग, मजूरवर्ग, अस्पृश्यवर्ग व स्त्रीवर्ग यांचा समावेश केलेला आहे. शिंदे यांनी आयुष्यभर ज्या पीडितांची व दुर्बलांची उन्नती करण्याचा ध्यास घेतलेला दिसतो त्या सगळ्या वर्गांचा समावेश

त्यांनी आपल्या जाहीरनाम्यात केला. अस्पृश्यवर्ग आणि स्त्रीवर्ग हया दोन्ही वर्गांचा निर्देश आपल्या जाहीरनाम्यात करण्यात विठ्ठल रामजी शिंदे यांचा वेगळेपणा दिसतो. शिंदे यांनी निर्देशिलेल्या या पीडित आणि दुर्बल वर्गांचा कैवार त्यांच्या आधी अथवा त्यांच्यानंतर राजकीय निवडणुकीच्या जाहीरनाम्यात एवढया सहेतुकपणे कोणी केला असे वाटत नाही.

या निवडणुकीत श्री. न. चिं. केळकर हे जहालांतर्फे, शेठ मानूरकर हे मवाळांतर्फे व श्रीमंत शाहू छत्रपतींच्या पाठिंब्यावर श्री. वासुदेवराव गुप्ते हे स्वतंत्रपणे उभे राहिले होते.

श्री. न. चिं. केळकरांच्या विरोधात शाहू महाराजांनी शिंद्यांना पाठिंबा देऊ केला होता. भवानी पेठेतील गूळ आळीत भरलेल्या प्रचारसभेत क्षात्र जगद्‌गुरू नेमण्याबाबत शाहू छत्रपतींनी जो विचार चालवला होता त्याबाबत अण्णासाहेब शिंद्यांनी बोलावे अशी सूचना करण्यात आली. मनुष्य अणि ईश्वर यामध्ये कोणीही मध्यस्थ असू नये अशी भूमिका असणा-या शिंद्यांनी जगद्‌गुरू नेमण्याच्या कल्पनेबद्दल नापसंती प्रकट केली. शिंदे यांच्यानंतर श्री. भास्करराव जाधव यांचे विरोधी भाषण झाले. बराच वाद माजला व सभा उधळली गेली. या प्रसंगानंतर शिंदे यांना निवडणुकीस उभे करणा-यांमध्येच फूट पडली. छत्रपती शाहू महाराजांनीही शिंद्यांच्या उमेदवारीला दिलेला पाठिंबा काढून घेतला. या सर्वांचे पर्यवसान विठ्ठल रामजी शिंदे या निवडणुकीत पराभूत होण्यात झाले.

भारतीय राजकारणात म. गांधींचा उदय झाल्यानंतर महर्षी शिंद्यांना जणू त्यांच्यामध्ये समानधर्मा आढळला. महात्माजींच्या जवळ समग्र जीवनाचा विचार होता व त्याला आध्यात्मिक बैठक होती. महात्माजींच्या व्यक्तिमत्त्वाने ते प्रभावित झाले होते. महात्मा गांधींच्या इतका आदरभाव अन्य कोणत्याही समकालीन राजकारणी पुरुषाबद्दल त्यांना वाटत असल्याचे दिसत नाही. याचा स्वाभाविक परिणाम म्हणून महर्षी शिंदे यांनी १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीत भाग घेतला. त्यावेळी त्यांचे वय सत्तावन्न वर्षांचे होते.

श्री. बाळूकाका कानेटकर व श्री. हरिभाऊ फाटक यांनी १९३० च्या एप्रिल महिन्यात कायदेभंग चळवळीत पुढारीपण घेण्याची विनंती अण्णासाहेब शिंदे यांना केली. शिंदे यांच्या बरोबर श्री. केशवराव जेधेही ह्या चळवळीत सामील झाले. शिंदे यांनी पुणे जिल्हयातील खेडोपाडी सत्याग्रही पथकाला घेऊन पायी तीन दौरे काढले. शिंदे यांचे हे दौरे वैशिष्टयपूर्ण असत. व्याख्याने, पोवाडे यांच्या साह्याने ते प्रचार करीत. खेडेगावातील मंडळी त्यांच्या या पथकाचे उत्साहाने स्वागत करीत व जेवणाखाण्याची सोय स्वयंस्फूर्तीने करीत. सत्याग्रही तुकडयांना निरोप देण्याचे समारंभ शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली अनेकदा होत. त्यांच्या पत्नी सौ. रुक्मिणीबाई शिंदे हया सत्याग्रह्यांना नारळ व आशीर्वाद देत.

पहिल्या दौ-यात त्यांनी हवेली तालुक्यातील बहुतेक गावामध्ये शंभर मैल पायी प्रवास करुन प्रचाराचे काम केले. पुढचा दौरा खेड तालुक्यामध्ये केला. या दौ-यात मीठ विकण्याचा कायदेभंग सुरू केला. दांडी येथून मिठाची मडकी आणण्यात आली होती. हया मिठाचा लिलाव होऊन बरीच रक्कम जमत असे. उन्हाळयाचे दिवस असल्याने सभेतील व्याख्याने ऐकण्यास शेतक-यांची गर्दी जमत असे व्याख्यान संपल्यावर विदेशी कापडाची होळी करण्यात येत असे. काही ठिकाणी सभांना पाचसात हजारांचा जमाव जमत असे. फेरीमध्ये गाणी,पोवाडे म्हटली जात. अण्णासाहेब शिंदे यांचा हा दौरा म्हणजे धार्मिक वारक-यांची एक दिंडीच झाली होती. स्वयंसेवक पथकाची शिस्त पाळीत. दौ-यामध्ये पथकाची शिस्त,त्यांनी चालवलेल्या कार्याचे पावित्र्य आणि जबाबदारी, अत्याचार आणि सहनशीलता यांचे महत्त्व ते समजावून सांगत असत. एक प्रकारे दौ-यात सामील झालेल्या स्वयंसेवकांचे ते आध्यात्मिक शिक्षणच होते. म.गांधीच्या भूमिकेचे मर्म त्यातून विशद होत असे.

भीमाशंकर वगैरे भागात त्यांचा तिसरा दौरा झाला. या दौ-यानंतर १८ मे १९३० रोजी वैशाख शुध्द पौर्णिमेस बुध्द जयंतीच्या दिवशी दुपारी १२ वाजता पुणे शहर पोलीस इन्स्पेक्टर मि. मिलर व जिल्हा इन्स्पेक्टर श्री. शिंदे हे त्यांना पकडण्यासाठी आले. मोटारीने त्यांना खंडाळा येथे नेऊन त्यांचे बाळपणीचे स्नेही डेप्युटी कलेक्टर श्री.माधवराव हुल्याळ यांच्या बंगल्यात त्यांच्यापुढे उभे करण्यात आले. श्री. हुल्याळ महर्षी शिंद्यांशी आदरपूर्वक वागले. त्यांना सहा महिने सक्त मजुरीची शिक्षा श्री.हुल्याळ यांनी फर्माविली. श्री.हुल्याळ हे शिंद्यांचे विद्यार्थिदशेतील स्नेही होते. १८९८ साली फर्ग्युसन कॉलेजमध्ये ते शिकत असताना हुल्याळ एकदा आजारी पडल्यावर रात्र रात्र जागून शिंदे यांनी त्यांची शुश्रुषा केली होती. याबद्दलची हकीकत आपल्याला त्यांच्या १८९८ सालच्या रोजनिशीत वाचावयास मिळते. आपल्या मित्रालाच शिक्षा करण्याचे अप्रिय काम हुल्याळांच्या वाट्याला आले होते. या प्रसंगी हुल्याळ यांच्या पत्नीचे डोळे अश्रूंनी भरून आले.

अण्णासाहेबांची रवानगी येरवडयाच्या तुरुंगात करण्यात आली. १ जुलै १९३० रोजी त्यावेळचे मुंबई इलाख्याचे शिक्षण मंत्री श्री. भास्करराव जाधव शिंद्यांना मुद्दाम भेटावयास गेले. चळवळीत भाग घेणार नाही असे शिंदे यांनी कबूल केले तर त्यांची सुटका करावी असा मनोदय भास्करराव जाधवांचा असावा. या भेटीत श्री.जाधव अण्णासाहेबांना म्हणाले," आता तुम्ही वृध्द झाला आहात. तुम्हास विश्रांतीची जरुरी आहे. ती घेण्याचे निश्चित करत असाल तर मी तुम्हास नेण्यासाठी आलो आहे." त्यावर अण्णासाहेब शिंदे म्हणाले," विश्रांतीच जर मला पाहिजे आहे तर मला येथल्या इतकी बाहेर दुसरीकडे कुठे मिळणार नाही. आणि आमच्यासारखी मंडळी येथे असली तर बाहेरची थोडी गडबड कमी होईल." श्री. भास्करराव

जाधव यांनी केलेली सूचना मान्य करणे महर्षी शिंदे यांच्या स्वभावाला मानवणारे नव्हते, की त्यांच्या तत्त्वनिष्ठेत बसणारे नव्हते.

या तुरुंगवासात अण्णासाहेब शिंदे आपल्या आयुष्यातील आठवणी लिहीत होते, रोजनिशी लिहीत होते. त्यांचे धर्माचरण तुरुंगातही चालू होते. ते कॅथॉलिक उपासनांना हजर राहात. तसेच जैनधर्मीय कैदी बंधूंबरोबर जैन धर्मावर चर्चा करीत. या काळात त्यांचे उच्च प्रतीचे धर्मचिंतनही चालू होते. १४ ऑक्टोबर १९३० रोजी त्यांची तुरुंगातून सुटका झाली. दुस-या दिवशी रे मार्केटात (आताचे फुले मार्केट) जाहीर सभा भरून त्यांचे अभिनंदन झाले. शेवटी माळ घातल्यावर ते म्हणाले, " आता कायदेभंग करून तुरुंगात जाणे इतकी सामान्य गोष्ट झाली आहे की, अशा माळा तुरुंगातून परत आलेल्याच्या गळ्यात न घालता, त्या माळा अद्यापि तुरुंगात न गेलेल्यांच्याच गळ्यात घातलेल्या ब-या." स्वतःच्या तुरुंगवासाकडे विनोदात्म दृष्टीने बघण्याचा व्यापकपणा त्यांच्या ठायी होता.

# ७. सुधारणेचे अन्य प्रयत्न

उदार एकेश्वरी धर्माचा प्रसार व अस्पृश्यता निवारणाचे कार्य हा महर्षी शिंदे यांच्या जीवितकार्याचा गाभा असला तरी या कार्याशी सुसंगत असलेले सुधारणेचे अन्य प्रयत्न त्यांनी केलेले दिसून येतात.

**मुरळी प्रतिबंधक चळवळ**: मुरळी सोडण्याची जी दुष्ट रूढी होती ती बंद करण्याचे त्यांनी केलेले प्रयत्न हे अशा कामाचा महत्त्वाचा भाग ठरतात. उदारमतवादी सुधारक असा त्यांचा मनःपिंड त्यांच्या विद्यार्थिदशेतच तयार झाला होता. ते पुण्यात कॉलेजमध्ये पहिल्या वर्षात शिकत असताना इ.स.१८९३ च्या मे मध्ये गावी आले असता अस्पृश्य जातीची एक पाचसात वर्षाची मुलगी सुधारण्यासाठी म्हणून त्यांनी आपल्या घरी आणून ठेवली. त्यांच्या आईवडिलांनीही त्या मुलीस स्वतःच्या मुलीप्रमाणे वागविले. नंतर ती बाई शिकून जमखंडी येथील अस्पृश्य मुलींच्या शाळेत शिक्षिका झाली.

अस्पृश्य वर्गात देवाला मुरळी वाहण्याची चाल होती. मुरळी वाहिलेल्या मुलीला पुढे अनीतीने व हालअपेष्टात दिवस काढावे लागत. अस्पृश्यता निवारणाचे कार्य त्यांनी सुरू केल्यानंतर अशा हतभागी मुलींच्या प्रश्नाकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. १८९१ व १९०१ मधील खानेसुमारीचे आकडे घेऊन देवाला वाहिलेल्या मुलींच्या प्रश्नासंबंधी १९०७ मध्ये त्यांनी एक लेख लिहिला. मुरळी, जोगतीण, भावीण, बसवी, देवदासी म्हणून ओळखल्या जाणा-या मुली खंडोबा, अंबाबाई, दारेश्वर, गुद्यमा इत्यादी देवतांना जेजुरी, तुळजापूर, कुमठा, शिरसी, सौंदत्ती इत्यादी देवाच्या ठिकाणी वाहिल्या जात याची त्यांनी क्षेत्रवार माहिती दिली. मुलीप्रमाणेच मुलगेही देवाला वाहण्याची चाल आहे. वाघ्या, आराध्या, पोतराज, जोग्या या नावाने ते ओळखले जातात. निकोप जीवन जगायला प्रतिबंध करुन मुलामुलींना अनीतीच्या मार्गात लोटणारी ही घातक चाल बंद करावी म्हणून विठ्ठल रामजी शिंदे यांनी प्रयत्न केला. त्यांनी "पश्चिम हिंदुस्थानातील मुलांचे रक्षण करणारी संस्था" १९०७ मध्ये स्थापन करून या चालीला आळा घालण्याचा प्रयत्न केला. ह्या मंडळींच्या कार्यकारी मंडळात न्या. मू.

चंदावरकर, सर भालचंद्र कृष्ण, एच्. आर्. एच्. वुईलकिन्सन या व्यक्ती होत्या. स्वतः शिंदे चिटणीस म्हणून काम पाहू लागले. डॉ.मॅन् यांनी ह्या बाबतीत विठ्ठल रामजींना सहकार्य दिले. हे काम करण्यासाठी या संस्थेने दरमहा साठ रुपयांच्या पगारावर दोन इन्स्पेक्टरही नेमले. १९११ साली त्यांनी मुंबईत मुरळी प्रतिबंधक परिषद भरविली. व्यक्तिगत स्वरुपाच्या प्रयत्नात त्यांच्या भगिनी जनाबाई यांनी त्यांना साह्य केले. खडकी येथील एका रोगग्रस्त मुलीची शुश्रुषा करून तिला जनाबाईनी बरे केले व हैद्राबाद येथील एका सभ्य गृहस्थाशी तिचे लग्न करून दिले. मुरळी सोडण्याच्या या अनिष्ट रूढीला प्रतिबंध करुन हतभागी मुलींच्या आयुष्याला कल्याणकारी वळण देण्याचा पहिला प्रयत्न महर्षी शिंदे यांनीच केला असे म्हणावे लागेल.

**शिमग्याची अनिष्ट चाल** : नैतिकदृष्ट्या अनिष्ट असणारी आणखी एक चाल म्हणजे शिमग्याची. ऐंशी वर्षापूर्वी शिमग्याच्या सणाला अत्यंत गलिच्छ व हिडीस रूप होते. हिंदू माणसांची व्यक्तिगत नीती बिघडवणारी व सार्वजनिक वर्तनात असभ्यपणा आणणारी ही चाल बंद करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. मुंबईतील ग्लोब मिलच्या पुढील मैदानात १९०७ साली एक सभा भरविण्यात येऊन या अनिष्ट चालीपासून लोकांना परावृत्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. १९१३ सालापासून या चळवळीकडे त्यांनी जास्त लक्ष दिले व प्रत्येक शाळेमार्फत शिमग्याच्या सणाच्यावेळी मुलांकरवी मनोरंजनाचे कार्यक्रम करवून आणि मर्दानी खेळ करवून शिमग्याच्या सणाला चांगले रूप देण्याचा प्रयत्न केला.

**मुलींना सक्तीचे शिक्षण** : १९१८-१९ च्या सुमारास पुण्यास म्युनिसिपालिटीतर्फे केवळ मुलांपुरते सक्तीचे प्राथमिक शिक्षण सुरू करण्याचा विचार चालला होता. सक्तीच्या शिक्षणातून मुलींना वगळणे हे विठ्ठल रामजी शिंदे यांना रुचले नाही. म्युनिसिपालिटीची सर्वसाधारण सभा या प्रश्नाचा विचार करण्यासाठी भरणार होती त्या दिवशी त्यांनी स्त्रियांची एक जंगी मिरवणूक शहरातून काढली. न्या. मू. रानड्यांच्या पत्नी रमाबाई रानडे यांनी आणलेली सेवासदनमधून वरिष्ठ वर्गाच्या स्त्रियांची मिरवणूक व अस्पृश्य वर्गातील स्त्रियांची अहल्याश्रमातून आलेली मिरवणूक अशा दोन्ही मिरवणुकी म्युनिसिपालिटीच्या कचेरीसमोर गेल्या. त्यामुळे त्या दिवसाची सभा म्युनिसिपालिटीला तहकूब करावी लागली. या प्रश्नावरील लोकमत अजमावण्यासाठी किर्लोस्कर थिएटरमध्ये श्री. शंकरराव भागवत यांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. या सभेत लोकमान्य टिळकांनी मुलींच्या सक्तीच्या शिक्षणाला विरोध केला. त्यानंतर गोंधळातच ही सभा बंद पडली. मुलींना सक्तीचे प्राथमिक शिक्षण द्यावे असे प्रतिपादन करणारी लेखमाला महर्षी शिंदे यांनी ज्ञानप्रकाशात लिहिली. या चळवळीचा परिणाम होऊन रँग्लर परांजपे हे शिक्षणमंत्री होताच त्यांनी सक्तीच्या शिक्षणाचा कायदा केला व म्युनिसिपालट्यांच्या हद्दीत मुलांच्या जोडीनेच मुलींचे सक्तीचे प्राथमिक शिक्षण सुरू झाले.

**शेतक-यांची चळवळ** : शेतकरीवर्गाची हलाखीची स्थिती कशी सुधारावी हा त्यांच्या उत्तरकालीन कार्यातील एक प्रमुख कळकळीचा विषय होता. १९२६ ते १९३२ या कालखंडात शेतक-यांच्या सभा भरवून, परिषदांमध्ये भाषणे करून त्यांच्यात जागृती करण्याचे महत्त्वपूर्ण काम त्यांनी केले. बहुजन पक्षाच्या निवडणुकीच्या काळात काढलेल्या जाहिरनाम्यामध्येही एक पीडित- शोषित वर्ग म्हणून त्यांनी शेतकरी वर्गाचा निर्देश केलेला होता.

१९२६ ते ३२ हा कालखंड वस्तुतः स्वातंत्र्यलढ्याच्या जिद्दीने भारलेला होता. स्वतः शिंद्यांनी त्यात भाग घेऊन तुरुंगवासही पत्करला होता. तरीही या काळात शेतक-यांच्या ख-याखु-या हिताची वस्तुनिष्ठ भूमिका कणखरपणे त्यांनी मांडली. तीमध्ये त्यांची शेतक-यांबद्दल असणारी आंतरिक तळमळ दिसून येते.

अस्पृश्यांची शेतकी परिषद (१९२६, पुणे), मुंबई इलाखा शेतकरी परिषद (१९२८, पुणे), वाळवे तालुका शेतकरी परिषद (१९३१, बोरगाव), संस्थानी शेतकरी परिषद (१९३२, तेरदाळ) व चांदवड तालुका शेतकरी परिषद (१९३२, वडनेर) या पाच परिषदांमध्ये त्यांनी शेतक-यांच्या समस्यांचे वस्तुनिष्ठ विवरण करुन स्वतःच्या भूमिकेतून मूलगामी उपाय सुचविले आहेत. ब्रिटिश सरकार, संस्थानिक, जमीनदार, काँग्रेस पक्ष व कामगार यांच्याशी शेतक-यांचे संबंध कशा प्रकारचे आहेत याचे विश्लेषण त्यांनी केले आहे. शेतक-यांवरील अन्याय पाहून ते संतापतात खरे, परंतु तीव्र भावनामयतेचे पटल त्यांच्या आकलनावर येत नाही. शेतजमीन नसलेल्या अस्पृश्यांची शेतकी परिषद म्हणजे त्यांना कोणीतरी जाणीवपूर्वक घडवून आणलेला बनाव वाटतो. अस्पृश्यांची गणना शेतक-यांत तर होत नाहीच, परंतु शेतमजुरातही होत नाही. दक्षिणेत तर शेतकरी हा जमिनीबरोबर गुरांप्रमणे विक्री होणारा दास असतो. वस्तुतः अस्पृश्य हे दंडकारण्याचे मूळ मालक होत ही जाणीव त्यांना देऊन "तुम्ही सर्वांनी एकी करून जमिनीवरील गेलेली सत्ता मिळविली पाहिजे" असे त्यांना आवाहन करतात.

ब्राह्म समाजाच्या शतसांवत्सरिक उत्सवासाठी कलकत्त्यास निघालेले शिंदे मुंबई शेतकरी परिषदेला पुण्यात धर्मकार्य समजून उपस्थित राहतात. सारावाढ व तुकडेजोड बिले शेतक-यावर लादण्यापाठीमागचा ब्रिटिश सरकारचा स्वार्थी मतलब ते विशद करून सांगतात. हिंदुस्थानातील मजूर आणि शेतकरी यांना असाहाय्य करण्याचा व त्यांचे शोषण करण्याचा ब्रिटिश सरकारचा डाव ते ओळखतात. शेतीच्या तुकड्याचा मोबदला पैशात देण्याऐवजी मोठया शेतक-याकडून जमिनी घेऊन ती लहान शेतक-यांना देण्याची व्यवस्था सुचवितात. त्यात जास्त अडचण असली तरी न्यायही जास्त आहे असे त्यांचे प्रतिपादन. बॅकबे डेव्हलपमेंट, सक्करचे धरण असली भांडवली खर्चाची प्रचंड कामे करण्यासाठी शेतक-यावर सारावाढ

लादणे म्हणजे उपाशी मरणा-या पीटरला लुबाडून उधळया पॉलला पैसा देण्याचा प्रकार त्यांना वाटतो. तुकडेजोडीचा उद्देशही सारा सुकरपणे वसूल करता यावा हा असल्याचे ते सांगतात. त्या मंदीच्या काळामध्ये सरकारने शेतक-यांकडून सारा नाण्यांऐवजी धान्यरूपात घ्यावा अशी क्रांतिकारक सूचना ते करतात.

बोरगाव येथील शेतकरी परिषदेत त्यांनी शेतक-याची व्याख्या केली ती अशी- “माझ्या मते शेतकरी तोच, की जो आपल्या कुटुंबाच्या व आश्रितांच्या पोषणाला, शिक्षणाला आणि योग्य त्या सुखसोयींना आवश्यक इतकीच आणि आपल्या आप्तांकडून व आश्रितांकडून वाहवेल इतकीच जमीन बाळगतो आणि ती आपण स्वतः आपल्या आप्तांच्या व आश्रितांच्या श्रमाने योग्य त्या रीतीने वाहतो. असे न करता जे जे म्हणून जमीन धारण करतात किंवा तिच्यावर हक्क सांगतात ते ते सर्व भांडवलदार, व शेतक-यांनी जी संघटना करायची ती सरकारविरूध्द.” १९३२ च्या सुमाराला शिंदे यांनी केलेले हे विश्लेषण मूलगामी म्हणावे लागेल. याच भाषणात ख़ेड्यातला शेतकरी व शहरातला कामगार यांनी जूट करावी असा महत्त्वाचा विचार ते सांगतात. भारतासारख्या देशात भांडवलशाहीशी मुकाबला करून ती नष्ट करायची असेल तर शेतकरी आणि कामगार यांची संयुक्त संघटना असावी. ही संघटना करण्यासाठी तुम्ही काँग्रेसवर अवलंबून राहू नये असेही ते परखडपणे शेतक-यांना सांगतात. कारण आजची काँग्रेस ही उद्याची पार्लमेंट आहे व कोणतेही सरकार हे भांडवलदाराला धार्जिणे असते असेही ते बजावतात.

शेतक-यांनी नुसतेच उत्पादनाकडे लक्ष देऊन चालणार नाही. त्यांनी अर्थकारणाकडे लक्ष दिले पाहिजे. “ तुम्ही काबाडकष्ट करणारे नांगरे म्हणून काळ न कंठता, तुम्ही एक हात अर्थ-उत्पादनात व दुसरा अर्थगाड्याच्या बैलाची शिंगदोरी खेचण्यासाठी मोकळा ठेवणे आवश्यक आहे”, असे ते त्यांना निक्षून सांगतात.

महर्षी शिंदे यांनी शेतक-यांच्या समस्यांचे पन्नास वर्षापूर्वी केलेले विश्लेषण व सुचविलेली उपाययोजना किती रास्त आहे हे आपल्याला आजच्या परिस्थितीतही पटते. ह्या विचारांच्या मुळाशी शेतक-यांबद्दल त्यांना वाटणारी आंतरिक कळकळ आहे हे आपल्याला जाणवल्यावाचून राहात नाही.

## ८. संशोधनकार्य आणि साहित्यसेवा

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे हे आयुष्यभर धर्मसेवा आणि समाजसुधारणा करण्यात अखंडपणे कार्यव्यापृत राहिले. त्यांना स्वतःच्या आवडीचे संशोधन व लेखन करण्यासाठी निवांतपणा मिळणे कठीण होते. परंतु त्यांची दृष्टी सत्यान्वेषी असल्याने व समाजशास्त्र, धर्म, इतिहास, तौलनिक भाषाशास्त्र या विषयांकडे त्यांचा ओढा असल्याने विविध प्रकारच्या कामाच्या धावपळीतूनही त्यांनी अत्यंत मूलगामी स्वरुपाचे संशोधन व लेखन केलेले आहे. जवळजवळ दोन हजार पृष्ठे भरतील एवढे वाङ्मय त्यांनी निर्माण केलेले पाहून आपल्याला अचंबा वाटल्यावाचून राहात नाही.

शिंद्यांचे बालपण जमखंडीला कानडी आणि मराठी अशा संमिश्र संस्कृतीच्या वातावरणात गेले. या दोन्ही संस्कृतीचे संस्कार त्यांच्या मनावर झाले. अर्धा युरोप त्यांनी डोळसपणे पाहिला. अनेकवार भारताच्या सगळया प्रांतात हिंडून चिकित्सकपणे निरीक्षण केले. समाजशास्त्र, इतिहास, मानववंशशास्त्र यांच्या सखोल व्यासंगाला त्यांच्या विवेचक बुध्दीची जोड मिळाली. त्यांचे निरीक्षण सूक्ष्म, दृष्टी वस्तुनिष्ठ आणि एका संस्कृतीपेक्षा दुसरी संस्कृती श्रेष्ठ, एका वंशापेक्षा दुसरा वंश श्रेष्ठ अशा प्रकारच्या पूर्वग्रहाचा अभाव आणि वृत्ती विश्वकुटुंबी, यांमुळे त्यांच्या संशोधनपर लेखनाला मौलिकता व श्रेष्ठ दर्जाची गुणवत्ता प्राप्त झाली आहे.

'भागवत धर्माचा विकास' ही त्यांची पाच लेखांची माला म्हणजे त्यांच्या संकल्पित धर्माच्या इतिहासाची प्रस्तावना होय. १९२५ साली मुळात पाच व्याख्यानांतून त्यांनी हा विषय मांडला. या लेखात त्यांनी भक्ती या तत्त्वाचा विकास अत्यंत प्राचीन काळापासून तो वर्तमान काळापर्यंत कसकसा होत आला याचे साधार, मूलग्राही विवेचन केलेले आहे. भारतीय संस्कृती म्हणजे आर्यांची संस्कृती, येथील आर्यपूर्व संस्कृती ही मागासलेली, अविकसित संस्कृती, आर्य संस्कृती ही श्रेष्ठ संस्कृती हे गृहीत धरुन त्यांच्या आधी विचार केला जात होता. परंतु आर्यपूर्व संस्कृतीचा प्रभाव भारतीय संस्कृतीमध्ये कसा दिसतो हे त्यांनी दाखविले. भक्ती

आणि योग ही तत्त्वे आर्यपूर्व संस्कृतीत कशी होती, याचे वेगवेगळे आधार देऊन व मोहंजोदडो येथे त्यावेळी नुकत्याच झालेल्या संशोधनातील पुरावा आधाराला घेऊन त्यांनी विवेचन केले आहे. भक्तीचा वैदिक धर्माशी फारसा संबंध नाही. वैदिक धर्म म्हणजे भौतिक धर्म व भागवत धर्म म्हणजे नैतिक धर्म असे ते वर्णन करतात. 'भागवत' या शब्दाची व्युत्पत्ती ते 'भग' या शब्दापासून करून 'देवी भागवत' म्हणजे देवीचे ऊर्फ शक्तीचे उपासक असल्याचे त्यांनी दाखवून दिले आहे. 'देवी भागवत', 'शिव भागवत', 'बौध्द भागवत', 'जैन भागवत' आणि 'विष्णू भागवत', असे पंचविध भागवतांचे प्रकार कल्पून त्यांचा परस्परसंबंध ते दाखवितात. काळाच्या ओघात बौध्द धर्म हिंदुस्थानातून गेला, जैन धर्माची प्रगती खुंटली व बाकी वैष्णव, शाक्त आणि शैव ह्या सर्वच पंथांची अवनती झाली. हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन व सुधारणा महाराष्ट्र भागवत धर्माने म्हणजे पंढरपूरच्या वारकरी संप्रदायाने कशी केली हे त्यांनी दाखवून दिले आहे. तसेच दक्षिणेकडील लिंगायत धर्म, उत्तरेकडील शीख धर्म आणि पूर्वेकडील चैतन्यांचा वैष्णव धर्म ह्यांनी हिंदू धर्माची सुधारणा कशी केली याचे विवरण त्यांनी लेखमालेच्या अखेरीस केले आहे.

भारतामधील विविध प्रांतातील अस्पृश्यवर्गाची स्थिती, स्वरूप, त्यांची नावे व संस्था यासंबंधी १९०१ मधील सरकारी खानेसुमारीचा आधार घेऊन व स्वतः भारतभर केलेल्या निरीक्षणाची जोड देऊन तत्कालीन अस्पृश्यवर्गाबद्दल १९०५ साली त्यांनी प्रथमतः मुंबई येथे 'सोशल रिफॉर्म असोसिएशन' पुढे व्याख्यान दिले व त्यानंतर 'इंडियन सोशल रिफॉर्मर' या नियतकालिकात ते लेखरूपाने प्रसिध्द करण्यात आले. शिंदे यांचा हा लेख भारतातील अस्पृश्य वर्गासंबंधी लिहिलेला पहिला संशोधनपर लेख म्हणावा लागेल. शिंदे हे आयुष्यभर प्रत्यक्ष अस्पृश्यता निवारणाचे कार्य करीत होतेच. शिवाय ही अस्पृश्यता कशी निर्माण झाली, इतिहासकाळापासून तिचे स्वरूप काय असावे, याबद्दल त्यांचे संशोधन व चिंतन चालू होते. याबद्दल वेळोवेळी ते लेखही लिहीत आले. अस्पृश्यतेसंबंधी समाजशास्त्रीय दृष्टिकोणातून लिहिलेला त्यांचा 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' हा प्रबंध १९३३ साली प्रसिध्द झाला. अस्पृश्यतेच्या प्रश्नावरील भारतामधील हा पहिलाच प्रबंध होय. या प्रबंधात त्यांनी अस्पृश्यतेच्या उगमापासूनचा इतिहास व बुध्दपूर्वकालापासून तो वर्तमानकाळापर्यंत दिसणारी अस्पृश्यतेची रूपे यांचे अत्यंत साधार असे विवरण केले आहे. अस्पृश्यांमधील वेगवेगळया नावांच्या व्युत्पत्ती, त्यांचा इतिहास, त्यांचा धर्म, सामाजिक स्थिती व त्यांचे राजकारण इत्यादी विषयांच्या अनुरोधाने विवेचन केले आहे. अस्पृश्यतेसंबंधी सर्वस्वी नवीन वाटावी अशी माहिती व निष्कर्ष त्यांनी या प्रबंधात साधार मांडले आहेत.

अस्पृश्यता ही आर्यपूर्व संस्कृतीतून आलेली असावी असे त्यांचे प्रतिपादन आहे.

अस्पृश्यतेचा उगम ते अभिचारमूलक अपधर्मात शोधतात. अस्पृश्य गणले जाणारे एकेकाळचे राज्यकर्ते होते हे मत ते मांडतात व भारतात सापडणा-या पुराव्याच्या जोडीने ब्रह्मदेशातील बहिष्कृतांचा स्वतः पाहिलेला पुरावा ते पुढे मांडतात. आजचे अस्पृश्य हे एकेकाळचे बौध्द असावेत हे मत ओरिसा येथील जंगली प्रदेशात राहणा-या जातीतील गाणी, त्यांची नावे व त्यांच्यात प्रचलित असणा-या कथा इत्यादिकांचा आधार घेऊन मांडतात. महर्षी शिंदे यांचे अस्पृश्यतेसंबंधीचे हे निष्कर्ष अत्यंत साधार, मूलभूत व पटण्याजोगे होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी शिंदे यांच्या मतांचा अन्य आधार देऊन विकास केला असल्याचे दिसून येते. अस्पृश्यांची सुधारणा तसेच अस्पृश्यतेचे संशोधन याबद्दल त्यांना किती आस्था होती हे त्यांच्या पुढील विधानावरून दिसून येते. ते म्हणतात "अस्पृश्यतेचा छडा लावण्यात, निवारण्याचा भाग तर राहू द्या, मला स्वतः ला जो जन्मभर अनुभव आला आणि आनंद झाला तो लक्षात घेता मला आणखी जन्म मिळाले तरी ते याच संशोधनात आणि सेवाशुश्रुषेत खर्चीन".

'मराठयांची पूर्वपीठिका' या विषयावर तौलनिक मानववंशशास्त्राच्या भूमिकेतून त्यांनी १९२९-३० मध्ये 'रत्नाकर' मासिकातून तीन लेख प्रसिध्द केले. व्युत्पत्तिशास्त्र, समाजशास्त्रीय अवलोकन यांच्या आधारे ते मराठा ही अनेक जातींपैकी एक जात नसून ते एक राष्ट्र आहेत आणि प्रसिध्द मानववंशही आहेत, असे प्रतिपादतात. रट्ट, राज आणि रथ या तीन निरनिराळ्या शब्दांशी मराठा या नावाचा असलेला संबंध ते दाखवितात व सुप्रसिध्द मानववंशशास्त्रज्ञ रॉलिन्सन याच्या 'हिस्ट्री ऑफ द पार्थियन्स' या ग्रंथाच्या आधारे मराठे हे पार्थव किंवा पल्लव वंशाचे असावेत असे साधार सुचवितात.

शिंदे यांच्या समाजशास्त्रीय स्वरुपाच्या संशोधनाप्रमाणेच त्यांचे तौलनिक भाषाविषयक संशोधनही महत्त्वाचे आहे. १९२३ साली लिहिलेल्या 'कानडी- मराठीचा परस्पर संबंध' या लेखात कानडी या जुन्या भाषेचा मराठीवर झालेला परिणाम केवळ शब्दांपुरताच मर्यादित नाही तर व्याकरणाच्या दृष्टीनेही तिचा मराठीवर दांडगा प्रभाव पडल्याचे ते दाखवितात. कोकणी व मराठीचा तुलनात्मक विचार करून कोकणी ही मराठीची पोटभाषा असल्याचे ते दाखवून देतात. मराठी भाषेच्या उत्पत्तीबद्दलही त्यांचा स्वतंत्र विचार आहे. मराठी ही महाराष्ट्री या प्राकृतातून आलेली नसून ती मगध देशातून पश्चिम बंगाल, ओरिसा, तेलंगण, व-हाड आणि कृष्णा व गोदावरी हयामधील उत्तर कर्नाटक हया प्रांतांतून प्रवास करीत असलेली एक भाषा असावी असे त्यांचे मत झाले होते.

अनेक शास्त्रांचा व्यासंग, साधार प्रतिपादन करण्याची दक्षता, बुध्दीची कुशाग्रता व दृष्टिकोणाचा व्यापकपणा यांमुळे महर्षी शिंदे यांच्या संशोधनपर लेखनाला मौलिकता प्राप्त

झालेली आहे.

एखाद्या सामाजिक प्रश्नाचा विचार करीत असता ते त्या प्रश्नाचा ऐतिहासिक संदर्भ विचारात घेऊन वर्तमान स्थितीचे आकलन करतात व मूल्यनिष्ठेची जोड देऊन त्याचे भविष्यकाळातील स्वरूप कसे असावे ते सांगतात. त्यामुळे सामाजिक प्रश्नांबाबतचे त्यांचे विवेचन महत्त्वपूर्ण ठरते. अस्पृश्यतेच्या प्रश्नाबाबत केलेले प्रतिपादन अथवा शेतक-यांच्या प्रश्नांची त्यांनी केलेली मांडणी यांमध्ये शिंदे यांचे हे गुणवैशिष्ट्य दिसून येते. महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा एकमेव मार्ग म्हणून ब्राह्मण, मराठे व अस्पृश्य यांच्यात एकजूट होण्याची आवश्यकता ते प्रतिपादतात. नव्याने निघू पाहणा-या पुणे येथील महाराष्ट्र विद्यापीठात सांगली, कोल्हापूर आणि धारवाड येथील कॉलेजे सामील करून घ्यावीत आणि कर्नाटकातील त्या कॉलेजांना भाषेचे माध्यम मराठी अथवा कानडी विकल्पाने ठेवण्याचा अधिकार द्यावा आणि कानडीचे जे मराठीवरचे उपकार झाले आहेत त्याची अशा रीतीने फेड करावी असे त्यांना वाटते. विद्यालयांतील विद्यार्थ्यांमध्ये कुलभाव निर्माण झाल्याने मुलामुलींत भावंडपणा निर्माण होऊन शाळा म्हणजेच एक बृहत् कुटुंब ठरेल व तेच खरे विद्यालयाने साधावयाचे आत्मीय शिक्षण होय, अशी त्यांची शिक्षणाच्या उद्दिष्टाबद्दलची कल्पना आहे. बडोदा येथे १९३५ साली भरलेल्या साहित्य संमेलनातील तत्त्वज्ञान व समाजशास्त्र शाखेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणात मराठीमध्ये स्वतंत्र तत्त्वज्ञान निर्माण झालेले नाही, जे झाले आहे ते भाष्यरूप ग्रंथांचे गारुड व पुढे पुढे तर एका गीतेच्या घाण्याभोवती मराठीतील समग्र तात्त्विक विचारचक्र फिरु लागले, अशी खंत ते प्रकट करतात.

१९०१ साली ते इंग्लंडला धर्मशिक्षणासाठी गेल्यापासून प्रार्थना समाजाचे मुखपत्र असलेल्या सुबोधपत्रिकेसाठी ते लेख पाठवीत होते. तेथून आल्यावर त्यांनी १९११ सालापर्यंत वेळोवेळी लिहिलेले लेख, दिलेली व्याख्याने व उपासनेच्या वेळी केलेले उपदेश असे एकंदरीत ८० लेख 'विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख व्याख्याने व उपदेश' या पुस्तकामध्ये संगृहीत करण्यात आलेले आहेत. पुढील कार्यकाळात त्यांनी अनेकविध सामाजिक, शैक्षणिक, व संशोधनपर विषयावर लिहिलेले लेख 'शिंदे लेखसंग्रह' या पुस्तकात समाविष्ट करण्यात आलेले आहेत.

कोणत्याही विषयावर शिंदे विचार मांडीत असोत, त्यामध्ये काहीएक मूलभूतता व दृष्टिकोणाचा व्यापकपणा प्रकट झाल्यावाचून राहात नाही. तो त्यांच्या सामाजिक विषयावरील लेखात जसा प्रकट होतो तसाच धर्मविषयक लेखनातूनही प्रकट होतो.

त्यांचे आत्मपरस्वरुपाचे लेखन म्हणजे 'माझ्या आठवणी व अनुभव' हे पुस्तक व फर्ग्युसन

कॉलेज (१८९८) मध्ये असताना, इंग्लंडमध्ये असताना (१९०१ ते १९०३) व येरवडयाच्या तुरुंगात असताना (१९३०) त्यांनी लिहिलेली रोजनिशी. १९३० साली येरवडयाच्या तुरुंगात असताना त्यांनी "माझ्या आठवणी व अनुभव" हे पुस्तक लिहावयास प्रारंभ केला होता. त्यानंतर खंड पडलेल्या या पुस्तकाचे लेखन आयुष्याच्या अखेरीस कंपवाताने विकल झालेल्या अवस्थेत त्यांनी पूर्ण केले. तुरुंगवासात असताना लिहिलेल्या या पुस्तकाच्या पहिल्या भागात शिंदे यांच्या ठिकाणी असलेल्या लालित्य गुणांचा उत्कट आविष्कार झालेला दिसतो. विशेषत: त्यांनी केलेले आपल्या बालपणीचे वर्णन, दारिद्याची स्थिती व प्रेमळ आईचे वर्णन अतिशय हृदयंगम उतरले आहे. एखादा प्रसंग अथवा एखादी व्यक्ती वाचणाराच्या डोळयासामोर साक्षात् उभी करण्याचे सामर्थ्य त्यांच्या लेखणीत आहे. त्यांच्या सर्वच लेखनात सूक्ष्म विनोदाचा आढळ प्रसंगोपात्त होताना दिसतो. या संपूर्ण आत्मपर पुस्तकात आत्मस्तुतीचा लेशही आढळत नाही, की इतरांना दूषणे दिल्याची उदाहरणे अपवादानेही दिसून येत नाहीत. या पुस्तकातून त्यांच्या उदात्त, प्रगल्भ व क्षमाशील व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय येतो.

विविध काळात लिहिलेल्या त्यांच्या रोजनिशीतूनही त्यांच्या त्याच प्रगल्भ व प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार होताना दिसतो व आल्हाददायक लेखनगुण आढळतात. त्यांनी १८९८ साली फर्ग्युसन कॉलेजमध्ये असताना लिहिलेली रोजनिशी म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या अगदी अखेरच्या टप्प्यातील पुण्याच्या शैक्षणिक, सांस्कृतिक, धार्मिक स्वरूपाच्या संस्थात्मक जीवनावर एका विचारी, चौरस दृष्टीच्या मनाने केलेले भाष्य आहे. तसेच त्यामध्ये एका भावनाशील, धर्मनिष्ठ मनाचा आविष्कारही आहे. त्या काळी पुण्यात घडणा-या सामाजिक स्वरुपाच्या घटना, होणारी व्याख्याने, निघणारी वर्तमानपत्रे यांवरील प्रतिक्रियात शिंदे यांच्या विचाराचा स्वतंत्रपणा तसेच मनाची प्रगल्भता दिसून येते. त्यांच्या इंग्लंडमधील रोजनिशीतून युरोपचा वेगळा निसर्ग, उद्योगप्रधान संस्कृती, लोकशाहीवादी वातावरण तसेच तेथील धर्मसंस्था, शिक्षणपध्दती, सार्वजनिक व कौटुंबिक जीवन, लोककल्याणकारी संस्था यांचा परिचय होतो. त्यांच्या प्रसन्न विनोदबुध्दीचा आविष्कारही होताना दिसतो. ग्लासगो येथील कॅथीड्रलमध्ये ते उपासनेला जातात त्यावेळचे वर्णन ते करतात, "फेट्यामुळे मला बराच नेहमीप्रमाणे मान मिळाला. अगदी पुढची जागा मिळाली. मद्रासला एकदा मागे बिशप होते त्यांचा आज उपदेश झाला. भाषणात हिंदुस्थानसंबंधी बोलताना माझाही उल्लेख केला. मी फेट्याचे आभार मानले." मॅड्मोझील् द्युगा या पॅरिसमधील बाईचे ते वर्णन करतात, "बाई अत्यंत गरीब, सभ्य व साधी आहे. हिचा पोषाख व वागणूक तर इतकी साधी दिसली की ही पारीस नगरीत राहण्यास जवळ जवळ अयोग्यच दिसली." इंग्लंडमधील रोजनिशीत त्यांच्या मनाच्या आध्यात्मिक ठेवणीचा, धर्मप्रवण मनोवृत्तीचा, लोकहिताच्या कळकळीचा, तसेच

त्यांच्या स्वाभाविक रसिकतेचा व सौंदर्यदृष्टीचा प्रत्यय येतो. शिंदे येरवडयाच्या तुरुंगात होते त्या वेळेला त्यांचे वय सत्तावन्न वर्षाचे होते. हया मानापमानाच्या पलीकडे जाणारी प्रौढ, शांत, स्थिर अशी त्यांची मनोवृत्ती झाली होती. म. गांधींनी आरंभिलेल्या स्वातंत्र्ययुध्दात त्यांनी धर्मबुध्दीने भाग घेतला होता. स्वाभाविकपणे येरवडयाच्या तुरुंगातील रोजनिशीत शिंदे यांच्या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा, तत्त्वचिंतक आणि काव्यात्म मनाचा व विनोदी वृत्तीचा प्रत्यय येतो.

त्यांच्या रोजनिशीत प्रवास असो की निसर्ग असो, प्रसंग असो की स्थळ असो, भावना असो की विचार असो, कुटुंब असो की व्यक्ती असो, अथवा एखादा श्रेष्ठ दर्जाचा आध्यात्मिक अनुभव असो या सा-यांचे वाचणाराच्या मनाला साक्षात प्रत्यय देणारे वर्णन शिंदे करतात. ही चित्रे डोळयासमोर दृश्य उभी करणारी असली तरी ती नुसती एकेरी वस्तुनिष्ठ अशी वर्णने नसतात. त्यात बघणाराची भावना व त्याच्या मनात उठणारे विचार यांची जोड असल्याने या वर्णनाला भरघोसपणा प्राप्त होतात. अशा प्रकारचा प्रत्यय देण्याचे सामर्थ्य शिंदे यांच्या शैलीत आहे. त्यांची लेखनशैली सरळ, नेमकी व जोरकस आहे. आवश्यक तेव्हा वेधकपणे ती अलंकाराचा उपयोग करते. तिचे वळण अस्सल मराठी आहे. संस्कृत वा इंग्रजी वळणाने त्यांची शैली दूषित झालेली नाही.

मनाची आध्यात्मिक ठेवण, व्यापकपणे विचार करणारी जीवनदृष्टी, तरल संवेदनशीलता, प्रसन्न विनोदवृत्ती, सूक्ष्म सौंदर्यदृष्टी आणि भाषेच्या सामर्थ्याची यथोचित जाण हे महर्षी शिंदे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष होत. त्यांचे 'माझ्या आठवणी व अनुभव' हे आत्मपर पुस्तक व त्यांची 'रोजनिशी' वाचताना अशा संपन्न व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय आपल्याला येतो.

# ९. उपसंहार

विठ्ठल रामजी शिंदे यांना १९३३ च्या अखेरपासून संधिवाताचा विकार सुरू झाला. डॉक्टरी तपासणीत त्यांना मधुमेहाचाही विकार जडला असल्याचे उघडकीस आले. त्यातच नंतर कंपवाताच्या विकाराची भर पडली. या शारीरिक विकलतेमुळे १९३३ नंतर त्यांची घडाडीची सार्वजनिक कामगिरी संपुष्टात आली. त्यानंतरची अकरा वर्षे जवळजवळ शरपंजरी पडलेल्या भीष्माचार्यासारखी त्यांची अवस्था झाली होती. २ जानेवारी १९४४ रोजी पुण्यातील राहत्या घरी त्यांनी इहलोकची यात्रा संपवली.

अण्णासाहेबांचे समग्र चरित्र डोळयासमोर आणले म्हणजे त्यांचे आयुष्य हे एक समर्पित जीवन होते असा ठसा आपल्या मनावर उमटतो. ऐन तारुण्यात आपले भावी आयुष्य गरिबी पत्करून उन्नत धर्मकार्याला वाहून घेण्याचा निश्चय करण्यात त्यांची अपूर्व त्यागशील वृत्ती दिसून येते. त्यांच्या ठायी स्वीकृत कार्याबद्दलची उच्च प्रतीची तळमळ असल्याने व तिला थोर नैतिक गुणांची जोड मिळाल्याने ते आपले आयुष्य उदार अशा धर्मप्रसाराच्या कार्यात व मनुष्यजातीला कलंकभूत ठरणारी अस्पृश्यता निवारण्याच्या कामी वाहू शकले.

त्यांच्या त्यागशील जीवनाचा व प्रखर ध्येयनिष्ठेचा प्रभाव इतरांवर पडून त्यांच्याप्रमाणेच या कामाला वाहून घेणारे सहकारी त्यांना मिळाले. त्यांचे कुटुंबीयही त्यांच्या कामामध्ये समरस झाले.

ज्या काळी भारतात अस्पृश्यतेच्या गंभीर समस्येची जाणीव नव्हती त्या काळी या प्रश्नाला आयुष्य वाहण्याचा व भारतभर ह्या कामाचा प्रसार करण्याचा त्यांनी निश्चय केला, यात त्यांचे दृष्टेपण दिसून येते, तसेच त्यांचा मनाचा विशालपणाही जाणवतो.

१९१४ सालच्या समाजसुधारकांच्या परिषदेत, अस्पृश्य समाजातील नुकतेच जागे झालेले लोक समाजसुधारकावर टीका करतात, ह्या तक्रारीवर बोलताना महर्षी शिंदे म्हणाले, "खूप तापलेला तवा थंड करण्यासाठी त्यावर थोडेसेच पाणी टाकले असता, त्याची वाफ होते व पाणी टाकणाराचे हात भाजतात असे अस्पृश्यांचे आहे. त्या समाजावर एवढा अन्याय झाला

आहे की,त्यांच्या ब-यासाठी काही अल्पस्वल्प प्रयत्न केले असता त्या योगे हा समाज शांत होण्याऐवजी उपचाराच्या अपुरेपणाने संतप्त होतो. म्हणून त्यांना दोष देऊ नये. उलट त्यांची दलित, अन्यायपीडित अवस्था ध्यानात घेऊन त्यांच्यावर सहानुभूतीचा व मदतीचा अधिक वर्षाव केला पाहिजे." या त्यांच्या प्रतिक्रियेतून त्यांच्या ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वाची साक्ष पटते. ज्या अस्पृश्य वर्गाच्या उन्नतीसाठी त्यांनी आपल्या आयुष्यातील उमेदीचे दीड तप अविश्रांतपणे कार्य केले,त्या वर्गातील मंडळीचा गैरसमज व असंतोष त्यांच्या वाट्याला आला. अस्पृश्य वर्गातून मिशन चालवू शकतील अशी कर्तबगार मंडळी पुढे येत आहेत हे पाहून त्यांनी ही संस्था त्यांच्या ताब्यात दिली व ते स्वतः बाजूला झाले. त्या प्रसंगीही त्यांच्या मनाचा समतोल ढळला नाही. अस्पृश्यता निवारणाचे त्यांचे जीवितकार्य त्यांनी यापुढेही आयुष्यभर चालू ठेवले. सार्वजनिक कामामध्ये या प्रकारची वृत्ती शिंदे यांच्यासारख्या धर्मनिष्ठाकडूनच प्रकट केली जाणे शक्य आहे.

धर्मप्रसार व अस्पृश्यता निवारण या कामाच्या खालोखाल त्यांनी महत्त्व दिले ते शेतक-यांच्या प्रश्नाकडे व स्त्रियांची स्थिती सुधारण्याकडे. महर्षी शिंदे यांनी आपल्या आयुष्यात ज्या प्रश्नांना हात घातला व ते सोडविण्यासाठी प्रयत्न केले त्यांचे महत्त्व आजही आपल्याला उमजू शकते. आजही स्त्री वर्गावरील अन्याय दूर करण्याचे प्रयत्न व शेतकरी वर्गाची स्थिती सुधारण्याच्या चळवळी हिरीरीने चालू असल्याच्या दिसतात. तेव्हा पाऊणशे वर्षापूर्वी हे प्रश्न निकडीचे मानून त्यासाठी कार्य करणा-या महर्षी शिंद्यांचे द्रष्टेपण आपल्या मनावर ठसते व त्यांच्या कार्याचे महत्त्व जाणवते.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून ते भारताला स्वातंत्र्य मिळेपर्यंतच्या शतकभराच्या काळातील महाराष्ट्रामधील सामाजिक, धार्मिक, राजकीय अशा चळवळींचे सामग्र्याने अवलोकन केले असता महर्षी शिंदे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि कार्याचे वेगळेपण आणि मौलिकता आपल्याला विशेषत्वाने जाणवते. या प्रदीर्घ कालखंडात महात्मा जोतीबा फुले, न्यायमूर्ती रानडे, प्रि. गोपाळ गणेश आगरकर, नामदार गोपाळ कृष्ण गोखले, लोकमान्य टिळक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांसारख्या विभूतींनी मोलाचे कार्य करून महाराष्ट्राची सामाजिक, धार्मिक व राजकीय पुनर्घटना करण्याचा प्रयत्न केला. या सा-यांनी आपापल्या कल्पनांनुसार काही विशिष्ट दृष्टिकोनावर व विशिष्ट कार्यावर भर दिला. महर्षी शिंदे यांचे वेगळेपण असे,की त्यांच्या कार्यात समाजाची सर्वांगीण पुर्नघटना करण्यास उपयुक्त ठरणा-या सगळ्या स्पृहणीय दृष्टिकोनांचा एकमेळ झालेला दिसतो. धार्मिक सुधारणेचा विचार करताना समाजाच्या कोणत्याही घटकावर प्रहार न करता सगळ्यांसाठी उन्नत धर्मविचाराचा ते प्रचार करतात. उन्नत धर्मविचार हा केवळ नागर लोकांपुरता मर्यादित राहू नये तर खेडेगावातील

लोकांपर्यंत तो पोहोचावा यासाठी ते झटतात. सामाजिक सुधारणेचा विचार करतानाही केवळ विशिष्ट वर्गाचा विचार न करता अस्पृश्यांपासून स्त्रियांपर्यंत आणि शहरी समाजापासून खेडेगावातील लोकांपर्यंतचा ते विचार करतात. धार्मिक- सामाजिक सुधारणेसाठी झटताना स्वातंत्र्यप्राप्तीची त्यांची आच यत्किंचितही कमी होत नाही. अस्पृश्यता निवारणाचे काम जीवितकार्य म्हणून पत्करले तरी त्याला विशाल मानवतेचे अधिष्ठान ते देतात. विशिष्ट धर्म बळकट करावा ही त्यांची धारणा नाही. समाजातील एका वर्गाची उन्नती करताना दुस-या वर्गाला विरोध करण्याची भूमिका न घेता हे दोन्ही वर्ग एकमेकांत मिसळून एका पातळीवर ते कसे येतील याबाबत ते प्रयत्नशील राहतात. स्पृश्य - अस्पृश्य, ब्राह्मण- ब्राह्मणेतर, मराठा- मराठेतर ही भेदवाचक भाषा त्यांना दु:सह वाटते. समाजातील वेगवेगळे भेद नाहीसे होऊन सारा समाज एकाच पातळीवर यावा असा त्यांचा ध्यास होता व त्यासाठी त्यांचा प्रयत्न होता.

महर्षी शिंदे यांच्या कार्यात सगळ्या स्पृहणीय दृष्टिकोनांचा समन्वय आढळतो. त्यांचे कार्य आणि व्यक्तिमत्त्व ह्या दृष्टीने अपूर्व आणि अपवादात्मक म्हणावे लागेल. मात्र असे असले तरी जे जे चांगले आढळते ते ते आपण घ्यावे असे बौद्धिक पातळीवरून वेचून त्याचा त्यांनी समन्वय साधलेला आहे असे मात्र नव्हे. या स्पृहणीय समन्वयाचा उगम त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणीतच आपल्याला दिसून येतो. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची घडण कशी झाली हे आपण प्रारंभी पाहिलेले आहेच. क्वचित एखाद्या प्रभावाखाली काही काळ ते आले तरी ते आपल्या अंतप्रेरणेचा कौल मानून त्या प्रभावातून ते स्वत:ला मुक्त करतात असेही त्यांच्या महाविद्यालयीन जीवनातील अल्पकालीन नास्तिक्यवादी भूमिकेच्या संदर्भात जाणवते. आपल्या अंत: प्रेरणेचा कौल घेऊनच त्यांनी जीवनातील महत्त्वपूर्ण निर्णय घेतले व कार्याची दिशा ठरविली असे दिसते. व्यक्तिमत्त्वाचा एवढा स्वतंत्रपणा आणि सच्चेपणा निश्चितच दुर्मिळ म्हणावा लागेल. त्यांचे अन्य व्यक्तींशी असलेले मतभेद, त्यांचा स्वभाव भावनाशील असूनही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या सच्चेपणामुळे त्या त्या व्यक्तींच्या आकलनात आणि मूल्यमापनात कधीही आड आले नाहीत. लोकमान्य टिळक, राजर्षी शाहू यांच्यासंबंधी त्यांनी जे लिहिले आहे त्यावरून विशेषत्वाने हे दिसून येते. त्यांच्या ह्या वृत्तीमुळे त्यांना आस्था असलेल्या अस्पृश्यताविषयक आणि अन्य प्रकारच्या सामाजिक आणि भाषाविषयक संशोधन कार्याला वस्तुनिष्ठता आणि मौलिकता प्राप्त झालेली आहे. ते इतरांशी असलेले मतभेद रोखठोकपणे सांगतात तसेच त्यांची थोरवी मोकळेपणाने नमूद करतात. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात एकांगीपणा नाही की वरपांगीपणा नाही. म्हणूनच विसाव्या शतकाच्या प्रारंभी अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यात स्पृश्य- अस्पृश्यांचे पुढारी, इहवादी आणि धर्मनिष्ठ धुरीण, राजकारणातील जहाल- मवाळ तसेच हिंदी संस्थानिक आणि ब्रिटिश अधिकारी यांचे साह्य घेऊन या अभूतपूर्व

कामाचा उठाव सा-या भारतभर करू शकले.

महर्षी शिंदे यांनी आयुष्यभर हे जे प्रचंड काम केले त्यात त्यांना यश किती मिळाले ? यशाचा विचार करताना लोकप्रियतेचा निकष आपण लावू शकतो काय ? अण्णासाहेबांच्या मतात एकांतिकता नव्हती, तशीच त्यांची तडजोडीची वृत्ती नव्हती. राजकारणातील त्यांची मते जहाल व बाणा स्वतंत्र होता. म्हणून मुंबई प्रार्थना समाजातील मवाळ थोरांना ते जवळचे राहिले नाहीत, तर राजकारण हे सर्वस्व असणा-या एकांतिक राष्ट्रवादी जहालांना ते जवळचे वाटलेच नाहीत. शिंद्यांनी जातीय राजकारण वर्ज्य मानले म्हणून सगळ्या मराठयांना ते जवळचे वाटले नाहीत. कर्मठ कर्मकांडावर आघात करणारे बहुजन पक्षवाले म्हणून सनातन्यांना, ब्राह्मणांना ते परकेच राहिले. मिशनसारखी मोठी संस्था ताब्यात घ्यायला उतावीळ झालेल्या अस्पृश्य पुढा-यांनाही ते नकोसे झाले. त्यांची दृष्टी व्यापक होती. एकजुटीच्या तत्त्वावर ते काम करू पाहात होते. याच गुणांमुळे त्यांना मोठी लोकप्रियता मिळाली नाही असे म्हणावे लागेल.

त्यांना त्यांच्या कार्यात यश मिळाले का ? यशाचे मोजमाप करणे सोपे नसते आणि त्यांनी जे कार्य आरंभिले ते अती बिकट होते. लोकांची मने पालटणे, त्यांचे शील पालटणे हेच त्यांच्या कार्याचे उद्दिष्ट होते. मग ते धर्मभावनेच्या संदर्भात असो, की अस्पृश्यांच्या प्रश्नाबाबत असो अथवा राजकारणाबाबत असो. त्यांनी अशा अवघड कामाला हात घालून जीवन वाहिले यातच त्यांचे विभूतीपण आहे. अशांचे अपयश हे लौकिक यशापेक्षा फार मोठे असते.

## संदर्भग्रंथ

**महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जीवनचरित्राचा अभ्यास करण्यासाठी उपयुक्त असलेल्या महत्त्वाच्या ग्रंथांची नोंद येथे केली आहे.**


१) बी. बी. केसकर (संपा), **विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख व्याख्याने व उपदेश**, मुंबई, दामोदर सावळाराम आणि मंडळी, १९१२.

२) विठ्ठल रामजी शिंदे, **माझ्या आठवणी व अनुभव**, पुणे, श्री लेखन वाचन भांडार, पुणे, १९५८.

३) कृष्णराव भाऊराव बाबर, **कर्मवीर विद्यार्थी**, भिलवडी, कृ. भा. बाबर, १९३०.

४) मा. प. मंगुडकर (संपा), **शिंदे लेखसंग्रह**, पुणे, ठोकळ प्रकाशन, १९६३.

५) गो. मा. पवार (संपा), **महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांची रोजनिशी**, औरंगाबाद, मराठवाडा साहित्य परिषद, १९७९.

६) संभाजीराव पाटणे, **महर्षी विठ्ठल रामजी शिंदे- एक धगधगीत व्यक्तिमत्त्व**, वाई, ब्राह्म समाज वाई, १९७६.

७) मा. प. मंगुडकर, गो. मा. पवार इ. (संपा), **भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न**, मुंबई, समाज कल्याण विभाग, महाराष्ट्र शासन, १९७६.

८) मा. प. मंगुडकर गो. मा. पवार इ. (संपा) **धर्म, जीवन आणि तत्त्वज्ञान**, मुंबई, समाज कल्याण विभाग, महाराष्ट्र शासन, १९७९.

९) द्वा. गो. वैद्य, **प्रार्थनासमाजाचा इतिहास**, मुंबई, प्रार्थना समाज मुंबई, १९२७.